श्रीमद्भगवद्गीतेच्या 2र्या अध्यायाचे नाव सांख्ययोग असे असून त्यात एकूण 72 श्लोक आहेत.

सञ्जय उवाच

तं तथा कृपयाऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम्।

विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः।।2.1।।

सञ्जय उवाच - तथा कृपया आविष्टम् अश्रु-पूर्ण-आकुल-ईक्षणम् विषीदन्तम् तम् मधुसूदनः इदम् वाक्यम् उवाच

सञ्जय उवाच - संजय म्हणाला

तथा अव्यय याप्रमाणे

कृपया करूणेने कृपा स्त्री तृ. ए. व.

आविष्टम् व्याप्त झालेल्या आ+विष् धातू क्त प्रत्यय पु. द्वि . ए. व. अश्रु-पूर्ण-आकुल-ईक्षणम् अश्रूंनी भरलेले नेत्र

अश्रु-पूर्ण-आकुल-ईक्ष नपु. द्वि. ए. व.

विषीदन्तम् शोकग्रस्त वि+सद् धातू शतृ प्रत्यय पु. द्वि. ए. व.

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

मधुसूदनः मधू दैत्याचा वध करणारे मधुसूदन पु. प्र. ए. व.

इदम् हे इदम् नपु द्वि. ए. व.

वाक्यम् वाक्य नपु. द्वि. ए. व.

उवाच म्हणाला वच् धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

आपल्या सर्वांना माहित आहेच की युद्धभूमीवर अर्जुनाचे आपल्याच नातेवाईक आणि गुरूजनांना समोर पाहून, त्यांच्याशी युद्ध करण्याच्या कल्पनेने अवसान गळाले. पहिल्या अध्यायातील शेवटच्या श्लोकात आपण असे वाचले की अर्जुनाने शोकाकुल अवस्थेत आपल्या हातातील धनुष्यबाण खाली ठेवून तो रथाच्या मध्यभागी बसला. आता त्याच्या पुढे..

क्षत्रिय धर्माला अजिबात न शोभणारी अशी अर्जुनाची अवस्था संजय अतिशय चपखल शब्दात वर्णन करत आहेत. संजयाने श्रीभगवानकृष्णांना मधुसूदन हे विशेषण वापरले आहे, ज्याचा उल्लेख पद्म पुराण, खंड 1, अध्याय 72 मध्ये सापडतो.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

संजय म्हणाला! अशाप्रकारे अतिशय दुःखाने आणि करूणेने व्यापून गेलेल्या, अश्रूपूर्ण नयन असलेल्या अर्जुनाला, मधुसूदनाने हे वचन सांगितले.

---

श्री भगवानुवाच

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम्।

अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन।।2.2।।

श्रीभगवान् उवाच - हे अर्जुन ! विषमे कुतः त्वा इदम् अनार्य-जुष्टम् अस्वर्ग्यम् अकीर्तिकरम् कश्मलम् समुपस्थितम्

श्रीभगवान् उवाच -

हे अर्जुन !

विषमे अस्वाभाविक विषम नपु. स. ए. व.

वि+सम् धातू समान असणे

कुतः कोठून अव्यय

त्वा तुला युष्मद् द्वि. ए. व.

इदम् हे इदम् नपु. द्वि. ए. व.

अनार्य-जुष्टम् आर्यांना न शोभणारे

अन आर्य जुष्टम्

अनार्यजुष्ट पु. द्वि. ए . व.

जुष् धातू प्रसन्न करणे क्त प्रत्यय

आर्य ऋ धातू प्राप्त करणे

अस्वर्ग्यम् स्वर्ग प्राप्त न होणारे

अस्वर्ग्य पु. द्वि. ए. व.

अकीर्तिकरम् काळीमा लावणारे

अकीर्तिकर पु. द्वि. ए. व.

कृत् धातू प्रसिद्ध होणे

कश्मलम् भ्रम कश्मल नपु. द्वि. ए. व.

कश् धातू शासन करणे

समुपस्थितम् प्राप्त झाले सम+उप+स्था धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

ह्या श्लोकात अनार्य जुष्टम् असा शब्द वापरला आहे म्हणजे आर्य आचरण करणार नाही असे.

ते समजून घेण्यासाठी आर्य शब्दाचा अर्थ समजून घ्यायला हवा.

सुमारे चौथ्या शतकात ' ' 'अमरकोश' नावाने संपादित झालेल्या कोशानुसार 'आर्य' शब्दाचे पुढिल अर्थ आहेत. (१) 'थोर कुळात जन्मलेला (महाकुल)', (२) 'कुलीन', (३) 'सभ्य', (४) 'सज्जन', (५) 'साधू'.

'मथुरेश' नामक विद्वानाने लिहिलेल्या 'शब्दरत्नावली' (17 वे शतक) या कोशामध्ये या शिवाय (६) 'पूज्य', (७) 'श्रेष्ठ ', (८) 'बुद्ध (ज्ञानप्राप्ती झालेला)' असे अर्थ दिलेले आहेत.

सुबीजं चैव सुक्षेत्रे जातं सम्पद्यते यथा ।

तथाऽर्याज् जात आर्यायां सर्वं संस्कारमर्हति ॥ मनुस्मृति 10.69।।

उत्तम जमिनीत जेव्हा उत्तम बीज रुजते तेव्हा ते उत्तम (मोठे) होते! त्याचप्रमाणे आर्य आणि आर्या यांच्या पोटी जन्माला आलेले मूल सुसंस्कारी होण्यास योग्य ठरतो.

ह्या श्लोकात तीन प्रकारच्या व्यक्तींचे वर्णन केले आहे.

आर्य, जे विचारवंत आणि कल्याणकारी कर्मे करतात

स्वर्ग्य जे पुण्य कर्म करून स्वर्ग प्राप्तीची इच्छा ठेवतात

किर्तीकर जे समाजासाठी चांगले कर्म करून किर्ती प्राप्त करतात.

अर्जुनाचे सध्याचे वागणे तीनही व्यक्तीवैशिष्ठ्यांविरूदध् असल्याने

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे अर्जुन! तुझ्या मध्ये ह्या अशा अटीतटीच्या प्रसंगी कसला भ्रम निर्माण झाला आहे? जो आर्यांच्या स्वभावाच्या विपरीत, न स्वर्ग प्राप्ती करून देणारा ना किर्ती मिळवून देणारा.

---

क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते। क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परन्तप।।2.3।।

हे पार्थ! क्लैब्यम् मा स्म गमः। एतत् त्वयि न उपपद्यते। हे परन्तप! क्षुद्रम् हृदय-दौर्बल्यम् त्यक्त्वा उत्तिष्ठ।

हे पार्थ!

क्लैब्यम् भ्याडपणा क्लैब्य नपु. द्वि. ए. व.

क्लीब् धातू दुर्बळ होणे

मा नको अव्यय

स्म हो अव्यय

गमः प्राप्त गम पु. प्र. ए. व.

गम् धातू

एतत् हा एतद् नपु. प्र. ए. व.

त्वयि तुझे युष्मद् ष. ए. व.

न अव्यय

उपपद्यते शोभनीय उप+पद् धातू जाणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

हे परन्तप! पर+तप् धातू

शत्रूला ताप देणारा

क्षुद्रम् क्षुद्र नपु. द्वि. ए. व.

हृदय-दौर्बल्यम् दुबळेपण हृदय-दौर्बल्य नपु. द्वि. ए. व.

त्यक्त्वा त्यागून त्यज् धातू क्त्वा प्रत्यय

उत्तिष्ठ ऊठ उद्+स्था धातू कर्तरि लोट्लकार य. पु. ए. व.

ह्या श्लोकात हे पार्थ! असे अर्जुनाला संबोधून कदाचित आपल्या आईचे स्मरण करून दिले असावे.  युद्धभूमीवर असा पळपुटेपणा केला तर तीला काय वाटेल? तीच्या कष्टांची बूज कोण ठेवणार?

खरे हृदय दुर्बळ असणे म्हणजे मृत्यू ला आमंत्रण. येथे मानसिक दुर्बलता असा अर्थ अभिप्रेत आहे. दैवीगुणांचे वर्णन करताना 16 व्या अध्यायातील पहिल्या श्लोकात निर्भयता हा गुण सांगितला आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! असा भ्याड होऊ नकोस, ते तुला शोभा देत नाही. हे परन्तप! ही अशी क्षुद्र दुर्बलता झटकून टाक आणि (पुन्हा) उभा रहा.

---

अर्जुन उवाच

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन। इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन।।2.4।।

अर्जुन उवाच - हे मधुसूदन! भीष्मम् द्रोणम् च सङ्ख्ये इषुभिः कथम् अहम् प्रतियोत्स्यामि? अरि-सूदन! (एतौ) पूजा-अर्हौ।

अर्जुन उवाच -

हे मधुसूदन!

भीष्मम् भीष्म पु. द्वि. ए. व.

द्रोणम् द्रोण पु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

सङ्ख्ये युद्धामध्ये सङ्ख्य नपु. स. ए. व.

सम+ख्या धातू गणना करणे

इषुभिः बाणांद्वारे इषु पु. तृ. ब. व.

इष् धातू जाणे

कथम् कसे अव्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

प्रतियोत्स्यामि प्रति प्रहार करू?

प्रति+युध् धातू कर्तरि लृट लकार उ. पु. ए. व.

अरि-सूदन शत्रू ला मारणारा सूद् धातू मारणे

पूजा-अर्हौ पूजनीय पूजा-अर्ह पु. प्र. द्वि. व.

ह्या श्लोकात इषु म्हणजे बाण असा शब्द वापरला आहे. पहिल्या अध्यायातील 4थ्या श्लोकात महेष्वासाः (महा+इषु+आस) असा अर्जुनाला उद्देशून म्हटले आहे. इष्वासः म्हणजे बाणाला स्थान देणारे म्हणजे धनुष्य. थोडक्यात मोठे धनुष्य बाळगणारा तो महाष्वास.

ख्या धातू पासून निर्माण झालेला शब्द सङःख्य म्हणजे युद्धभूमी, ह्या मागे काय विचार आहे? ख्या म्हणजे मोजणी करणे, आळवणी करणे. (ख्याल गायकी) पुन्हा पुन्हा आपले आणि शत्रूचे संख्याबळ किती आहे त्याची चाचपणी करणे. म्हणून संख्य म्हणजे युद्धभूमी.

ज्याची विवेकबुद्धी जागृत आहे अशा कोणत्याही व्यक्तीस असा संभ्रम होणे अपरिहार्य आहे. आपल्याच नातेवाईक आणि गुरूजनांना मारून, राज्य मिळवून असे कोणते सुख मिळणार आहे? ज्यांच्या पुढे नतमस्तक झालो त्यांनाच, त्यांनीच शिकवलेल्या युद्ध कौशल्याने ठार करायचे?

अशा मनःस्थितीत असलेला अर्जुन ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांना असे म्हणतो की

हे अरिसूदन! हे मधूसूदन! मला पूजनीय असणाऱ्या भीष्म आणि द्रोणाचार्यांवर युद्धामध्ये मी बाणांनी प्रतिहल्ला कसा करू?

---

गुरूनहत्वा हि महानुभावान्

श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।

हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव

भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्।।2.5।।

महानुभावान् गुरून् अहत्वा, इह लोके भैक्ष्यम् अपि भोक्तुम् श्रेयः हि। गुरून् हत्वा इह रुधिर- प्रदिग्धान् अर्थ-कामान् भोगान् एव तु भुञ्जीय

महानुभावान् महानुभाव पु. द्वि. ब. व.

महत् अनुभवः

गुरून् गुरू पु. द्वि. ब. व.

अहत्वा, न मारून

अ+हन् धातू क्त्वा प्रत्यय

इह ह्या अव्यय

लोके लोकात लोक पु. स. ए. व.

भैक्ष्यम् भिक्षा भैक्ष्य नपु. द्वि. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

भोक्तुम् भोगून भुज् धातू तुमुन प्रत्यय

श्रेयः श्रेयस् नपु. प्र. ए. व.

हि कारण अव्यय

गुरून् गुरू पु. द्वि. ब. व.

हत्वा मारून हन् धातू क्त्वा प्रत्यय

इह ह्या अव्यय

रुधिर-प्रदिग्धान् रक्ताने माखलेले

प्र +दिह् धातू लपेटणे क्त प्रत्यय पु. द्वि. ब. व.

अर्थ-कामान् अर्थ प्राप्तीची इच्छा

अर्थ-काम पु. द्वि. ब. व.

भोगान् भोग पु. द्वि. ब. व.

एव सुद्धा अव्यय

तु परन्तु अव्यय

भुञ्जीय भोगून भुज् धातू कर्तरि विधीलिङः लकार आत्मनेपदी उ. पु. ए. व.

ज्याची सद्विवेकबुद्धि शाबूत आहे तो वेळप्रसंगी स्वतःचे नुकसान करून घेईल, स्वतः कष्टमय जीवन स्वीकारेल पण दुसऱ्याचे नुकसान करणार नाही. जर युध्द केलेच नाही तर त्यानंतर पांडवांची काय परीस्थिती असेल असा विचार अर्जुनाच्या मनात येणे सहाजिकच आहे. संपत्तीपेक्षा अब्रू आणि प्रतिष्ठा महत्त्वाची, असे मानणारा तो काळ, युद्ध जिंकल्यावर राज्य मिळेल पण स्वतः च्या आणि लोकांच्या नजरेतून मी उतरेन असे समजण्याचा तो काळ. ज्याने तारतम्य सोडून दिलेले नाही तो गुरूजनांना मारण्याचा विचार तरी कसा करेल?

ह्या श्लोकात गुरूजनांना महानुभावान् असे विशेषण वापरले आहे, म्हणजे त्यांच्या युद्ध करण्याच्या हेतूवर कसलाही आक्षेप नाही.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

ह्या महान गुरूजनांना मारण्यापेक्षा भिक्षा मागून उदरनिर्वाह करणे जास्त श्रेयस्कर. गुरूजनांना मारून रक्तरंजित धन संपत्ती चा उपभोग घ्यावा लागेल.

---

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो

यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः। यानेव हत्वा न जिजीविषाम

स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः।।2.6।।

एतत् च, न विद्मः नः कतरत् गरीयः यत् वा (वयं) जयेम,? यदि वा (ते) नः जयेयुः । यान् हत्वा न जिजीविषामः, ते एव धार्तराष्ट्राः प्रमुखे अवस्थिताः।

एतत् हे एतद् नपु. द्वि. ए. व.

च, सुद्धा अव्यय

न नाही अव्यय

विद्मः जाणत विद् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ब. व.

नः आमच्या साठी अस्मद् ष. ब. व.

कतरत् दोघांपैकी कोणते कतरत् नपु. प्र. ए. व.

गरीयः श्रेष्ठ गरीयस् नपु. प्र. ए. व.

यत् वा किंवा अव्यय

जयेम, जिंकू जि धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ब. व.

यदि वा  किंवा अव्यय

नः आमच्या साठी अस्मद् ष. ब. व.

जयेयुः जिंकू जि धातू कर्तरि विधीलिङः उ. पु. ब. व.

यान् ज्यांना यद् पु. द्वि. ब. व.

हत्वा मारून हन् धातू क्त्वा प्रत्यय

न नाही अव्यय

जिजीविषामः जगण्याची इच्छा

जीव+सन् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ब. व.

ते तद् पु. प्र. ब. व.

(ते) एव तेच अव्यय

धार्तराष्ट्राः धृतराष्ट्राचे पुत्र धार्तराष्ट्र पु. प्र. ब. व.

प्रमुखे आमच्या समोर प्रमुख नपु. स. ए. व.

अवस्थिताः उभे आहेत अव+स्था धातू क्त प्रत्यय पु. प्र. ब. व.

आधीच्या श्लोकात अर्जुनाला, पांडवांचा विजय रक्तरंजित नसावा असे वाटत होते. ह्या श्लोकात नक्की पांडवच जिंकतील का, असा विचार त्याच्या मनात येत आहे. आयुष्यात आपल्याच माणसांविरूदध आपण जिंकलो तर ती आपली हारच असते. शिवाय समोर पितामह भीष्म आणि द्रोणाचार्य यासारखे गुरू उभे आहेत.

स्वयम्भूर्नारदः शम्भुः कुमारः कपिलो मनुः। प्रह्लादो जनको भीष्मो बलियासकिर्वयम्।।

श्रीमद्भागवतम्-6.3.20

"धार्मिक सिद्धान्ता प्रमाणे  महान विद्वानांची नावे पुढील प्रमाणे स्वयंभू ब्रह्मा, नारद मुनि, भगवान शिव, चार कुमार, भगवान कपिल, स्वयंभू मनु, महाराज प्रह्लाद, महाराज जनक, भीष्म पितामह, महाराज बली, शुकदेव मुनि, आणि वेदव्यास"।

ह्या श्लोकात अर्जुन असे म्हणत आहे की

आम्हाला हे सुद्धा माहित नाही की आमच्या साठी काय उचित आहे? आम्ही युद्ध जिंकणार की ते युद्ध जिंकणार? ज्यांना मारल्यावर आमची जगण्याची इच्छा उरणार नाही तेच धृतराष्ट्राचे पुत्र आमच्या समोर उभे आहेत.

---

कार्पण्यदोषोपहतस्वभावः

पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः।

यच्छ्रेयः स्यान्निश्ि‍चतं ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम्।।2.7।।

कार्पण्य-दोष-उपहत-स्वभावः धर्म-सम्मूढ-चेताः त्वाम् (अहं) पृच्छामि। यत् श्रेयः स्यात् तत् मे निश्चितम्, ब्रूहि। अहम् ते शिष्यः। त्वाम् प्रपन्नम् माम् शाधि।

कार्पण्य-दोष-उपहत-स्वभावः मनाच्या दुर्बलतेमुळे नष्ट झालेला (मूळ) स्वभाव कार्पण्य-दोष-उपहत-स्वभाव पु. प्र. ए. व.

कृपणस्य भावः कृप धातू दुर्बल असणे.

उप+हन् धातू मारणे

धर्म-सम्मूढ-चेताः कर्तव्य पथावर संभ्रमित झालेला धर्म-सम्मूढ-चेतस् पु. प्र. ब. व.

सम+मुह् धातू भ्रमित होणे

त्वाम् आपल्याला युष्मद् द्वि. ए. व.

पृच्छामि विचारतो प्रछ् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

यत् जो यद् नपु द्वि. ए. व.

श्रेयः योग्य श्रेयस् नपु. प्र. ए. व.

स्यात् असेल अस् धातू कर्तरि परस्मैपदी विधीलिङः प्र. पु. ए. व.

तत् ते तद् नपु द्वि. ए. व.

मे मला अस्मद् ष. ए. व.

निश्चितम्, निश्चितपणे निश्चित नपु. प्र . ए. व.

ब्रूहि सांगा ब्रू धातू कर्तरि लोट्लकार म. पु. ए. व.

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

ते तुमचा युष्मद् ष. ए. व.

शिष्यः शिष्य पु. प्र. ए. व.

त्वाम् तुम्हाला युष्मद् द्वि. ए. व.

प्रपन्नम् शरणागत प्र+पद् धातू क्त प्रत्यय नपु. प्र. ए. व.

माम् मला अस्मद् द्वि. ए. व.

शाधि उपदेश करा शास् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

संकटातून मार्ग काढण्याचा उत्तम उपाय म्हणजे तज्ञांचे मार्गदर्शन. ह्या श्लोकात प्रथमच अर्जुन श्रीभगवानकृष्णांशी गुरू-शिष्याचे नाते जोडू पहात आहे. अर्जुनाची अत्यंत द्विधा मनस्थिती झाली आहे. अनेक प्रश्न त्याच्या डोक्यात घोंघावत आहेत.

गु शब्दस्तु अंधकारः स्यात् रु शब्दस्तन्निरोधकः ।

अंधकारनिरोधत्वात् गुरु इति अभिधीयते ।।

'गु'कार म्हणजे अज्ञानरूपी अंधकार आणि 'रु'कार म्हणजे त्या अंधकाराचा नाश करणारे ज्ञानरूपी तेज; म्हणून गुरु म्हणजे अज्ञानरूपी अंधकार घालवणारा.

तस्माद् गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम्। शाब्दे पर च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम्।।

श्रीमद्भागवतम्-11:3:21

"सत्याचा शोध घेणाऱ्याने अध्यात्मिक गुरु ला पूर्ण शरण गेले पाहिजे. ज्याला वैदिक ग्रन्थांचे सार चांगलेच समजते आणि जो संसारात न रमता तो परमेश्वराला पूर्ण शरण जातो.

अर्जुनाने युद्ध करणे हेच श्रेयस्कर ठरेल आणि तेच त्याचे कर्तव्य सुद्धा आहे हे शास्त्रोक्त पद्धतीने समजावून सांगणारे गुरू, त्याच्या समोरच आहेत.

युद्धभूमीवरून घाबरून पळून जाणे हा काही क्षत्रियाचा स्वभाव नव्हे. कर्तव्यासमोर आपुलकी आणि आदर श्रेष्ठ ठरल्याने क्षत्रिय धर्माचे पालन होऊ शकत नाहीये.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणत आहे की

(पापाच्या) भीतीमुळे (मूळ) स्वभावावर परीणाम झाल्याने कर्तव्यपथावरून भरकटलेला मी आपणास विचारत आहे की, माझ्या साठी जे योग्य असेल ते मला निश्चितपणे सांगावे कारण मी आपल्याला शरण आलेला शिष्य आहे, मला उपदेश द्यावा.

---

न हि प्रपश्यामि ममापनुद्या

द्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्। अवाप्य भूमावसपत्नमृद्धम्

राज्यं सुराणामपि चाधिपत्यम्।।2.8।।

हि भूमौ असपत्नम् ऋद्धम् राज्यम्, सुराणाम् आधिपत्यम्,च अवाप्य अपि न प्रपश्यामि यत् मम इन्द्रियाणाम् उच्छोषणम् शोकम् अपनुद्यात् ।

हि अव्यय

भूमौ भूमि स्त्री. स. ए. व.

असपत्नम् शत्रू नसलेला अ+सपत्न नपु. द्वि. ए. व.

सपत्न शत्रू

सह+पा धातू पालन करणे

ऋद्धम् संपन्न ऋध् धातू वृद्धि होणे क्त प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

राज्यम्, राज्य नपु. द्वि. ए. व.

सुराणाम् देवतांचे सुर पु. ष. ब. व.

आधिपत्यम्, स्वामित्व आधिपत्य नपु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

अवाप्य प्राप्त होऊन अव+आप धातू व्यापणे ल्यप प्रत्यय

अपि सुद्धा अव्यय

न अव्यय

प्रपश्यामि पहात आहे प्र+दृश् धातू पाहणे कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

यत् जो यद् नपु. प्र. ए. व.

मम माझे अस्मद् ष. ए. व.

इन्द्रियाणाम् इन्द्रियांचे इन्द्रिय नपु. ष. ब. व.

उच्छोषणम् सुकुन जाणारे उच्छोषण नपु. द्वि. ए. व.

उद्+शुष् धातू शुष्क होणे

शोकम् शोक पु. द्वि. ए. व.

अपनुद्यात् दूर होईल अप+नुद् धातू प्रेरित होणे कर्तरि आशिर्लिङः उभयपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात अर्जुनाने श्रीभगवानकृष्णांना आपले गुरू मानले आता त्याच्या मनातली तळमळ तो आपल्या गुरूला सांगत आहे.

युद्ध जिंकल्यावर जरी मोठे संपन्न असे राज्य मिळाले तरी आपल्या लोकांना मारल्यानंतर हे सर्व मिळाले आहे ह्याची बोच राहणारच.

राजा अलेक्झांडर ला मृत्यूसमयी अगदी असेच वाटले होते. इतकी युद्धे जिंकून, राज्य मिळवून सुद्धा माझे हात रिकामेच राहिले असे त्याने म्हटले होते.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे म्हणतो की

पृथ्वीवरचे निष्कंटक, समृद्ध असे राज्य किंवा स्वर्गातील देवतांचे अधिपत्य असलेले वैभव जरी मिळाले तरी शरीर शुष्क करणारे दुःख संपेल असे वाटत नाही.

---

सञ्जय उवाच

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परन्तप।

न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह।।2.9।।

सञ्जय उवाच - परन्तपः गुडाकेशः हृषीकेशम् एवम् उक्त्वा 'न योत्स्ये' इति ह गोविन्दम् उक्त्वा तूष्णीम् बभूव ।

सञ्जय उवाच -

परन्तपः शत्रू ला ताप देणारा

गुडाकेशः निद्रेवर विजय मिळवणारा पु. प्र. ए. व.

हृषीकेशम् कृष्णाला पु. द्वि. ए. व.

एवम् असे अव्यय

उक्त्वा म्हणून वच् धातू क्त्वा प्रत्यय

'न योत्स्ये' युद्ध करणार नाही युध् धातू कर्तरि आत्मनेपदी लृट लकार उ. पु. ए. व.

इति असे अव्यय

ह स्पष्ट अव्यय

गोविन्दम् गोविंदाला गोविन्द पु. द्वि. ए. व.

उक्त्वा म्हणून वच् धातू क्त्वा प्रत्यय

तूष्णीम् शांत अव्यय

बभूव झाला भू धातू कर्तरि लिट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या 3,4 श्लोकातील अर्जुन आणि श्रीभगवानकृष्ण यांच्या मधील संवाद संजय ऐकत असल्याने, त्यांनी ते धृतराष्ट्रासमोर मांडले आहे.

ह्या श्लोकात संजय धृतराष्ट्राला असे म्हणतात की

अशाप्रकारे गुडाकेश, परंतप अर्जुन भगवान हृषिकेश यांना हे गोविन्द! मी युद्ध करणार नाही असे म्हणून गप्प झाला.

---

तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत। सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः।।2.10।।

हे भारत! हृषीकेशः उभयोः सेनयोः मध्ये विषीदन्तम् (अर्जुनं) तम् प्रहसन् इव इदम् वचः उवाच।

हे भारत!

हृषीकेशः हृषीकेश पु. प्र. ए. व.

उभयोः दोन्ही बाजूंच्या मध्ये उभ नपु. ष. द्वि. व.

सेनयोः सैन्याच्या सेना स्त्री. ष. द्वि. व.

मध्ये मध्य पु. स. ए. व.

विषीदन्तम् शोकमग्न (अर्जुनं) वि+सद् धातू शक्तीहीन होणे शतृ प्रत्यय पु. द्वि. ए. व.

तम् त्याला तद् पु. द्वि. ए. व.

प्रहसन् हसून प्र+हस् धातू शतृ प्रत्यय

इव जणू अव्यय

इदम् हे इदम् नपु. द्वि. ए. व.

वचः वचन वचस् नपु. द्वि. ए. व.

उवाच म्हणाले वच् धातू कर्तरि लिट लकार प्र . पु. ए. व.

संजय आता धृतराष्ट्राला पुढे असे सांगत आहेत की

हे भारत! दोन सेनांच्या मध्ये शोकाकुल अर्जुनाला किंचित हसून असे वचन (उपदेश) सांगितले.

---

श्री भगवानुवाच

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे।

गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः।।2.11।।

श्रीभगवानुवाच - त्वम् अशोच्यान् अन्वशोचः। प्रज्ञा-वादान् च भाषसे। पण्डिताः गतासून् अगतासून् च न अनुशोचन्ति।

श्रीभगवानुवाच -

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

अशोच्यान् शोक करण्यास योग्य नाही असे

अ+शोच्य पु. द्वि. ब. व.

अन्वशोचः शोक करणे अन्वशोच पु. प्र. ए. व.

प्रज्ञा-वादान् विद्वत्तापूर्ण प्रज्ञा-वाद पु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

भाषसे म्हणतोस भाष् धातू कर्तरि लट लकार म. पु. ए. व. आत्मनेपदी

पण्डिताः अज्ञान दूर करणारे पण्डित पु. प्र. ब. व.

पण्ड् धातू नष्ट होणे

गतासून् प्राण निघून गेलेल्या गत+असु पु. द्वि. ब. व.

असु - प्राणवायू

अगतासून् प्राण न गेलेल्या अ+गत +असु पु. द्वि. ब. व.

च सुद्धा अव्यय

न अनुशोचन्ति दुःख करत नाहीत

अनु+शुच् धातू दुःख करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

7व्या श्लोकात अर्जुनाने श्रीभगवानकृष्णांचे शिष्यपद स्वीकारले. त्यानंतर 8 व्या श्लोकात अर्जुन असे म्हणतो की कोणत्याच उपायाने त्याच्या दुःखाचे निवारण होईल असे वाटत नाही. त्यावर आता श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला उपाय सांगत आहेत. म्हणजे श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला भगवद्गीता सांगण्याचे प्रयोजन दुःख निवारण तर नसेल? ह्या श्लोकापासून श्रीमद्भगवद्गीतेतील तत्वज्ञानाचे धडे सुरू झाले आहेत असे वाटते. ह्या श्लोकात दुःख कोणत्या गोष्टींचे करावे किंवा कोणत्या गोष्टींसाठी करू नये ह्या संबंधी विवेचन केले आहे.

तदिदं कालरशनं जगत् पश्यन्ति सूरय: ।

न हृष्यन्ति न शोचन्ति तत्र यूयमपण्डिता: ॥श्रीमद्भागवतम् ।। 8.11.8 ॥

कालाची गती जाणणारे विद्वान लोक कोणत्याही परिस्थितीत हर्षित होत नाहीत किंवा चिंतीत होत नाहीत.

श्रीमद्भगवद्गीतेच्या आगामी अध्यायात श्रीभगवानकृष्णांनी स्पष्टपणे म्हटले आहे की प्रत्येक आत्म्यामधे परमेश्वरी अंश आहे. हे शरीर नश्वर असून आत्मा अमर आहे. असे असताना नष्ट होणाऱ्या शरीरासाठी दुःख करून काय होणार? अर्जुन शस्त्रविद्ये मध्ये अतिशय पारंगत,पण आता त्याचे अध्यात्मिक शिक्षण सुरू झाले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

ज्यांच्या मागे दुःख करण्यात काही अर्थ नाही, त्यासाठी तू दुःख करत आहेस. आणि विद्वत्तापूर्ण बोलत आहेस. पण ज्ञानी माणसे मृत आणि जीवित दोघांसाठीही दुःख करत नाहीत.

---

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः। न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम्।।2.12।।

न तु एव, जातु अहम् न आसम् न त्वम् न इमे जनाधिपाः। न च एव अतः परम् वयम् सर्वे न भविष्यामः।

न अव्यय

तु परन्तु अव्यय

एव, आणि अव्यय

जातु कदाचित् जन् धातू +क्तुन् प्रत्यय

अहम् मी अस्मद् प्र. ए. व.

न अव्यय

आसम् होतो अस् धातू कर्तरि लङः लकार उ. पु. ए. व.

न अव्यय

त्वम् तुम युष्मद् प्र ए. व.

न

इमे हे इदम् पु. प्र. ब. व.

जनाधिपाः जनपाल

जन अधिप पु. प्र. ब. व.

पा धातू रक्षण करणे

न अव्यय

च अव्यय

एव अव्यय

अतः परम् ह्याच्या नंतर अव्यय

वयम् आपण अस्मद् प्र. ब. व.

सर्वे सर्व पु. प्र. ब. व.

न अव्यय

भविष्यामः असणार नाही

भू धातू कर्तरि लृट लकार उ. पु. ब. व. परस्मैपदी

आधीच्या श्लोकात शरीर नश्वर आहे आणि आत्मा अमर आहे असे सांगून झाल्यावर 4थ्या अध्यायातील 5व्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी असे सुद्धा म्हटले आहे की आपल्या दोघांचे अनेक जन्म झाले आहेत. (ह्या जन्मी आपली नावे कृष्ण आणि अर्जुन अशी आहेत.) थोडक्यात पुनर्जन्मावर भाष्य केले आहे . नावात काय आहे? ह्या जगप्रसिद्ध प्रश्नाची येथे आठवण आल्याशिवाय रहात नाही. कारण काही व्यक्तींची नावे अजरामर असतात. भले त्यांचा मृत्यू नंतर पुनर्जन्म झाला असेल.

यदा एतत् त्रयं ब्रह्म इति कश्चित् विन्दते आत्मा अनन्तः विश्वरूपः अकर्ता भवति॥श्वेताश्वतरोपनिषद्-1.9

येथे त्रयं चा अर्थ परमात्मा, आत्मा आणि माया असा घ्यायचा आहे. जेव्हा जीवात्म्याला तीनही गोष्टी एकच आहेत हे समजते, तेव्हा ते ब्रह्म असते.

आत्मशोध म्हणजे 'स्वतःला ओळखा' म्हणजे 'ग्नोथी सीटन' असे ग्रीस भाषेतील सूत्र अपोलो मंदिरात वाचायला मिळते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

कधीकाळी मी नव्हतो किंवा तू नव्हतास. किंवा हे राजे नव्हते. आणि भविष्यात आपण नसू असेही नसेल.

---

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा। तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति।।2.13।।

यथा देहिनः अस्मिन् देहे कौमारम् यौवनम् जरा, तथा देहान्तर-प्राप्तिः। धीरः तत्र न मुह्यति।

यथा जसे अव्यय

देहिनः शरीर धारण केलेला आत्मा

देहिन् पु. ष. ए. व.

अस्मिन् ह्यामधे इदम् नपु. स. ए. व.

देहे शरीरात देह पु. स. ए. व.

कौमारम् कुमार अवस्था कौमर नपु. द्वि. ए. व.

यौवनम् तारूण्य यौवन नपु. द्वि. ए. व.

जरा वृद्धावस्था जरा स्त्री. प्र. ए. व.

तथा तसे अव्यय

देहान्तर-प्राप्तिः शरीराचे स्थानांतर

देह अन्तर प्राप्ति स्त्री. प्र. ए. व.

धीरः धैर्यवान धीर पु. प्र. ए. व.

तत्र तेथे अव्यय

न मुह्यति मोहित होत नाही मुच् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

पुनर्जन्म हा जरी शास्त्रीय दृष्ट्या सिद्ध करता येत नसला तरी समाजात दिसणाऱ्या असंख्य व्यक्ती आणि त्यांचे कार्य, त्यांच्या वाट्याला आलेले विविध प्रसंग आणि अनुभव, आपल्याला पुनर्जन्मावर विश्वास ठेवायला भाग पाडतात. आपल्या समोर असणारे संत ज्ञानेश्वरांचे उदाहरण. 15 वर्षांचा मुलगा गीतेवर भाष्य करून दाखवतो कारण त्याचे ज्ञान त्यांनी आधीच्या जन्मात मिळवलेले असते. हाच तर्क आपण बालकलाकारांना सुद्धा लावू शकतो, त्यांची प्रतिभा पाहून जेव्हा आपण आवाक् होऊन जातो.

भारतीय धर्मात (शीख बौद्ध जैन हिंदू) पुनर्जन्म मानतात पण इतर धर्मात सुद्धा तो निरनिराळ्या प्रकारे ओळखला जातो. मेटेम्पसाइकोसिस म्हणजे आत्म्याचे स्थलांतर, विशेषतः मृत्यूनंतर त्याचा पुनर्जन्म. हा शब्द प्राचीन ग्रीक तत्वज्ञानातून घेतला गेला. Orphism, (रहस्यवाद), Hermeticism, (एकान्तवास) Neoplatonism, (अध्यात्म विद्या) Manichaenism, (मानीवाद)आणि Gnosticism (गूढ ज्ञानवाद) अशा अनेक तत्वज्ञानात पुनर्जन्मावर भाष्य केले आहे.

भगवान जीझस नी जॉन पूर्वजन्मी पैगम्बरांचा अवतार होता असे म्हटले आहे. (मैथ्यू 11.13-14, मैथ्यू 17.10.13)

आत्म्याचा शरीरात प्रवेश झाला, म्हणजे बाळाचा जन्म झाला की त्याला बालपण यौवन वार्धक्य ह्या अवस्थांतून जावेच लागते, त्याला संसार अशी संज्ञा आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की आत्म्याच्या माणसाच्या शरीरात जशा बालपण, यौवन आणि वृद्धावस्था अशा निरनिराळ्या अवस्था असतात तसेच (एका शरीरातून दुसऱ्या शरीरात स्थानांतर) दुसऱ्या शरीराची प्राप्ती होते, पण धैर्यवान माणसे ह्यामुळे विचलित होत नाहीत.

---

मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः।

आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत।।2.14।।

हे कौन्तेय! शीत-उष्ण-सुख-दुःखदाः,मात्रा-स्पर्शाः तु आगम-अपायिनः, अनित्याः। हे भारत! तान् तितिक्षस्व।

हे कौन्तेय!हे कुन्तिपुत्र शीत-उष्ण-सुख-दुःखदाः,

थंडी उन्हाळा, सुख दुःख देणारे

शीत-उष्ण-सुख-दुःख द पु. प्र. ब. व.

मात्रा-स्पर्शाः इन्द्रियांविषयी जाणीव

मात्रा-स्पर्श पु. प्र. ब. व.

तु परन्तु अव्यय

आगम-अपायिनः, येणे जाणे आगम-अपायिन् पु. प्र. ब. व.

आ+गम् धातू जाणे

अप+इ धातू जाणे

अनित्याः अ नित्य पु. प्र. ब. व.

हे भारत!

तान् त्या सर्वांना तद् पु. द्वि. ब. व.

तितिक्षस्व सहन करण्याचा प्रयत्न कर

तिज् धातू सहन करणे कर्तरि लोट्लकार आत्मनेपदम् म. पु. ए. व.

मा धातू म्हणजे मोजणे ह्यापासून तयार झालेला शब्द मात्रा. मात्रा ह्या शब्दाचे अनेक अर्थ आहेत.

1. ए, ऐ, ओ, औकार दर्शवणारी रेघ.

2. कोणताही वर्ण उच्चारण्यासाठी लागणारा वेळ.

3. औषधांच्या मिश्रणाचे प्रमाण

4. इलाज (रौद्ररूपाची मात्रा बरोबर लागू पडली)

ह्या श्लोकात मात्रा-स्पर्श असा शब्द वापरला आहे. इन्द्रियांना ज्ञान प्राप्त करण्याचे साधन मानले आहे. इन्द्रियांच्या सानिध्यात आलेल्या गोष्टींमुळे ज्ञान प्राप्त होते म्हणून मात्रा-स्पर्श.

हा श्लोक आपल्याला त्या काळातील हवामानाची सुद्धा माहिती देतो. तेव्हा सुद्धा कडक उन्हाळा आणि हिवाळा असे ऋतू होते असे दिसते आहे. अती उष्ण आणि अती शीत तापमानाचा आपल्याला त्रास होतो. उष्ण आणि हे शब्द दुःख आणि सुख ह्या भावनांच्या छटा दर्शवतात. ह्या जगात कोणतीही गोष्ट चिरकाल टिकून रहात नाही. उन्हाळ्यानंतर हिवाळा येतच असतो.

आधीच्या श्लोकात आत्मा मृत्यूपश्चात देह बदल करतो त्याबद्दल ज्ञानी माणसे स्थितप्रज्ञ राहतात असे म्हटले आहे. शिवाय शरीराच्या निरनिराळ्या अवस्थांचे वर्णन केले आहे. जसे शरीरात नित्य बदल होत राहतात तसेच इन्द्रियांच्या कार्यात सुद्धा निरनिराळे अनुभव येत राहतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे कौन्तेय! इन्द्रियांमुळे जाणवणारी शीत, उष्ण, सुख दुःख हि येत जात असतात, कायम टिकणारी नसतात, हे भारत त्यांना तू सहन करायला शिक.

---

यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ। समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते।।2.15।।

हि हे पुरुष-ऋषभ ! सम-दुःख-सुखम् धीरम् यम् पुरुषम् एते न व्यथयन्ति, सः अमृतत्वाय कल्पते।

हि कारण अव्यय

हे पुरुष-ऋषभ ! श्रेष्ठ पुरूष सम-दुःख-सुखम् दुःख सुख समान

सम-दुःख-सुख पु. द्वि. ए. व.

धीरम् विवेकी धीर पु. द्वि. ए. व.

यम् जो यद् पु. द्वि. ए. व.

पुरुषम् पुरूष पु. द्वि. ए. व.

एते हे सर्व एतद् नपु. द्वि. द्वि. व.

न व्यथयन्ति, व्यथित होत नाही

व्यथ् धातू णिच प्रत्यय कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

अमृतत्वाय अमरत्वासाठी अमृतत्व नपु. च. ए. व.

कल्पते योग्य असतो

कृप् धातू कल्पना करणे कर्तरि लट लकार प्र पु. ए. व. आत्मनेपदी

आपल्या संविधानाचा गाभा समता आहे. संविधानातील सर्व तरतुदी समतेवर आधारित आहेत. ह्या श्लोकात समता थोड्या वेगळ्या पद्धतीने मांडली आहे.

ऋषभ शब्दाचे अनेक अर्थ आहेत. ह्या श्लोकात अभिप्रेत असलेला अर्थ श्रेष्ठ असा आहे.

युद्धाचे परीणाम म्हणजे प्रचंड हानी, पण युद्ध तर करायचेच आहे. म्हणजे संकटकाळी परीस्थिती बदलण्याचा प्रयत्न करायचा नाहीये तर परिस्थितीला सामोरं जायचं आहे. मग हि परिस्थिती हाताळायची कशी, त्याचे वर्णन ह्या श्लोकात केले आहे.

जो परिस्थिती अतिशय कुशलतेने हाताळू शकतो त्याच्या कडे धडाडी असते, उर्जा असते, मरगळलेली व्यक्ती असे नाही करू शकत. ह्या अर्थाने अमृतत्व असा शब्द वापरला आहे. अशी व्यक्ती दखलपात्र असतो. त्याचे उदाहरण एक धडा म्हणून सांगितले जाते. अशा व्यक्ती कायम लोकांच्या मनात असतात म्हणजेच त्यांना अमरत्व प्राप्त झालेले असते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पुरुष-ऋषभ! जे दुःख आणि सुखाचा समतोल साधणारे धीरोदत्त पुरूष व्यथित होत नाहीत, त्यांना अमरत्व प्राप्त होते.

---

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः।उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः।।2.16।।

असतः भावः न विद्यते सतः तु अभावः न विद्यते। अनयोः उभयोः अपि अन्तः तत्त्व-दर्शिभिः दृष्टः।

असतः सत्य नाही असे न+सत् नपु. ष. ए. व.

भावः अस्तित्व भाव पु. प्र. ए. व.

न अव्यय

विद्यते जाणणे विद् धातू समजणे आत्मनेपदी कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सतः शाश्वत सत् नपु. ष. ए. व.

तु परन्तु अव्यय

अभावः अस्तित्वहीन अ+भाव पु. प्र. ए. व.

न अव्यय

विद्यते जाणतो विद् धातू आत्मनेपदी कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अनयोः  या इदम् पु. ष. द्वि. व.

उभयोः दोन्हीचे उभ नपु ष. द्वि. व.

अपि सुद्धा अव्यय

अन्तः निष्कर्ष अन्त पु. प्र. ए. व.

तत्व-दर्शिभिः साक्षात्कारी तत्त्वदर्शिन् पु. तृ. ब. व.

दृष्टः दिसून आले आहे

दृश् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

14 व्या श्लोकात सुखदुःखे येत जात असतात, हे सांगितले. शरीर नश्वर आहे आणि आत्मा अमर. शरीराच्या निरनिराळ्या अवस्था आहे आणि आत्मा शरीराचे स्थलांतर करतो हे सर्व आपण आधीच्या आतापर्यंतच्या श्लोकात वाचले आहे. एखाद्या व्यक्तीची ओळख फक्त शारिरीक पातळीवर मर्यादित नसून ती आत्मिक पातळीवर घडावी लागते. बरेचदा आपण बोलून जातो, अमुक एका व्यक्तीच्या रूपात देवच भेटला. म्हणजे ती व्यक्तीची छोटीशी कृती आपल्याला तारून नेते. महाभारतात सुद्धा दुर्योधनाने कृष्णाचे परमेश्वरी रूप ओळखले असते तर युद्ध झालेच नसते. थोडक्यात बाह्य रूप ही खरी ओळख नाही. म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

असत्य गोष्टींचे शाश्वत अस्तित्व नाही आणि सत्य गोष्टींचा अभाव नसतो. असा ह्या दोन्ही तत्त्वांचा साक्षात्कारी पुरूषांकडून निष्कर्ष काढला गेला आहे.

---

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम्।

विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति।।2.17।।

अविनाशि तत् तु विद्धि, येन इदम् सर्वम् ततम्। अस्य अव्ययस्य विनाशम्, कश्चित् न कर्तुम् अर्हति

अविनाशि अ+विनाशिन् पु. प्र. ए. व.

तत् तद् नपु. द्वि. ए. व.

तु परन्तु अव्यय

विद्धि, समज विद् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

येन ज्याने यद् पु. तृ. ए. व.

इदम् इदम् नपु. प्र. ए. व.

सर्वम् संपूर्ण सर्व नपु. प्र. ए. व.

ततम् व्याप्त तत नपु. प्र. ए. व.

तन् धातू पसरणे क्त प्रत्यय

अस्य ह्याचे इदम् पु. ष. ए. व.

अव्ययस्य शाश्वताचे अ+व्यय पु. ष. ए. व.

विनाशम्, विनाश पु. द्वि. ए. व.

कश्चित् कोणीतरी किम् चित पु. प्र. ए. व.

न

कर्तुम् करण्यास कृ धातू तुमून प्रत्यय

अर्हति समर्थ आहे अर्ह् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात सत् आणि असत् म्हणजेच नित्य आणि अनित्य याबद्दल सांगितले होते आता ह्या श्लोकात सत् बद्दल आणखी भाष्य केले आहे. जसे सोन्याचा दागिना पुन्हा पुन्हा घडवून त्याला निरनिराळे आकार देता येतात तसेच आत्मा निरनिराळी शरीरे धारण करीत असला तरी आत्मा तसाच राहतो जसे सोन्यामध्ये कोणताही बदल होत नाही. कारण आत्मा अविनाशी आहे.

त्याचे दुसरे वैशिष्ट्य म्हणजे तो सर्वव्यापी आहे. पंचमहाभूतांमधे सुद्धा चेतना शक्ती असते. आधुनिक काळात हे मान्य झाले आहे. नदीला, तर 'जीवित' असा दर्जा शासनदरबारी देऊ केलेला आहे. पाण्याला स्मृती असते असे सुद्धा म्हटले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हि गोष्ट अविनाशी आहे असे तू समजून घे. ही सर्वव्यापी आहे, अशी व्यय न होणाऱ्या गोष्टीचा नाश करण्याचे कोणाकडेच सामर्थ्य नाही.

---

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः।

अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत।।2.18।।

अनाशिनः अप्रमेयस्य नित्यस्य शरीरिणः इमे देहाः अन्तवन्तः उक्ताः। तस्मात् हे भारत, युध्यस्व।

अनाशिनः नाश न होणारा अ+नाशिन् पु. ष. ए. व.

अप्रमेयस्य मोजता न येणारा अ+प्रमेय पु. ष. ए. व.

प्र+मा धातू मोजणे

नित्यस्य शाश्वतनित्य पु. ष. ए. व.

शरीरिणः देहधारी जीवात्मा शरीरिन् पु. ष. ए. व.

इमे हे सर्व इदम् पु. प्र. ब. व.

देहाः शरीरे देह पु. प्र. ब. व.

अन्तवन्तः नाशवंत अन्तवत् पु. प्र. ब. व.

उक्ताः म्हटले गेले आहे

वच् धातू क्त प्रत्यय पु प्र. ब. व.

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

हे भारत,

युध्यस्व युध् धातू कर्तरि लोट्लकारः म. पु. ए. व.

आत्म्याची आणखी वैशिष्ट्ये ह्या श्लोकात सांगितली आहेत. बृहद-आरण्यक उपनिषदात मैत्रेयी याज्ञवल्क्य ऋषींना आत्मन कसे दिसते असे विचारल्यावर ते खारट पाण्याची उपमा देतात. त्या पाण्यात मीठ दिसते का? तर नाही. तुम्हाला ते चव घेतल्यावर समजते. म्हणून आत्म्याला अप्रमेय असे म्हटले आहे. ज्याची मोजणी करता येत नाही.

बालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च।

भागो जीवः स विज्ञेयः स चानन्त्याय कल्पते॥श्वेताश्वतरोपनिषद्।5.9।।

एका केसाच्या टोकाच्या शंभराव्या भागाचे शंभर भागासारखा हा आत्मा आहे.  ज्याचा अंत नाही.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

नाश न होणारा, अमर्याद, शाश्वत अशा आत्म्याने धारण केलेले शरीर नाशवंत आहे असे म्हणतात म्हणून हे भारत! तू युद्ध कर.

---

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम्। उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते।।2.19।।

यः एनम् हन्तारम् वेत्ति, यः च एनम् हतम् मन्यते उभौ तौ न विजानीतः, अयम् न हन्ति न हन्यते।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

एनम् ह्याला इदम् पु. द्वि. ए. व.

हन्तारम् हत्या करणारा हन्तृ पु. द्वि. ए. व.

वेत्ति, जाणतो विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

यः जो यद् पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

एनम् ह्याला इदम् पु. द्वि. ए. व.

हतम् मारला गेलेला हन् धातू क्त प्रत्यय पु. द्वि. ए. व.

मन्यते मानतो मन् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व. आत्मनेपदी

उभौ दोघे उभ पु. प्र. द्वि. व.

तौ ते दोघे तद् पु. प्र. द्वि. व.

न अव्यय

विजानीतः, जाणतात वि+ज्ञा धातू कर्तरि लट लकार प्र. पु. द्वि. व. परस्मैपदम्

अयम् हे इदम् पु. प्र. ए. व.

न अव्यय

हन्ति मारतो हन् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व. परस्मैपदम्

न अव्यय

हन्यते मारला जातो हन् धातू कर्मणि लट लकार प्र. पु. ए. व. आत्मनेपदी

ह्या श्लोकात आत्म्याचे आणखीन एक वैशिष्ट्य सांगितले आहे.

श्रीमद्भगवद्गीतेच्या 4थ्या अध्यायातील 5व्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी असे म्हटले आहे की आपल्या दोघांचे अनेक जन्म झाले आहेत, फक्त ते मला माहीत आहेत आणि तुला माहित नाही.

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन |

तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परन्तप || 4.5||

आत्मा म्हणजे चेतना शक्ति.

आत्मा म्हणजे एखादी वस्तू नव्हे, जिचे अस्तित्व संपवता येईल.

शक्ती चा नाश होऊ शकत नाही फक्त तीचे स्वरूप बदलू शकते असे विज्ञान सुद्धा सांगते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो व्यक्ति ह्याचा मारेकरी असे मानतो, जो मृत झाला असे मानतो, दोन्ही गोष्टी जाणत नाहीत, की हा मारला जात नाही आणि मरतही नाही.

---

न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः। अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे।।2.20।।

अयम् कदाचित् न जायते, म्रियते वा न वा, भूत्वा भूयः न अभविता । अयम् अजः नित्यः शाश्वतः पुराणः, शरीरे हन्यमाने न हन्यते।

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

कदाचित् कधीही अव्यय

न अव्यय

जायते, जन्म घेतो जन् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व. आत्मनेपदी

म्रियते मृत होतो मृ धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व. आत्मनेपदी

वा अथवा अव्यय

न अव्यय

वा, अव्यय

भूत्वा उत्पन्न होऊन भू धातू क्त्वा प्रत्यय

भूयः पुन्हा अव्यय

न अव्यय

अभविता  अ+भाविता होणारा भू धातू होणे कर्तरि लुट लकार प्र. पु. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अजः अजन्म अज पु. प्र. ए. व.

नित्यः नित्य पु. प्र. ए. व.

शाश्वतः शाश्वत पु. प्र. ए. व.

पुराणः, प्राचीन पुराण पु. प्र. ए. व.

शरीरे शरीराचा शरीर नपु. स. ए. व.

हन्यमाने मारले गेल्यावर हन्यमान नपु. स. ए. व.

न अव्यय

हन्यते मारला जातो हन् धातू कर्मणि लट लकार प्र. पु. ए. व. आत्मनेपदी

आधीच्या 3,4 श्लोकात आत्म्याची वैशिष्ट्ये आपण वाचली ह्या श्लोकात जसे खुंटा हलवून हलवून बळकट करतात त्याप्रमाणे पुन्हा एकदा त्यावर शिक्कामोर्तब झाले आहे.

आत्म्याच्या वैशिष्ट्यावर भाष्य करणारे इतर श्लोक.

न जायते म्रियते वा विपश्चिन्नायं कुतश्चिन्न बभूव कश्चित्।

अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे।। कठोपनिषद्-1.2.18

" ह्या आत्म्याचा जन्म होत नाही, तो मरत सुद्धा नाही , हा कुठुनही प्रकट झालेला नाही, है, ना कुणा व्यक्तीपासून निर्माण झाला. हा अजन्म, अविनाशी, शाश्वत, शरीर नष्ट झाले तरी नष्ट न होणारा असा आहे.

स वा एष महानज आत्माजरोऽमरोऽमृतोऽभयो। बृहदारण्यकोपनिषद्4.4.25

"हा महान आत्मा, अजन्म अविनाशी, चिरकालीन, अमर आणि भय मुक्त आहे "

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हा आत्मा कोणत्याही काळात जन्म घेत नाही, मरतही नाही. पुन्हा पुन्हा उत्पन्न होत नाही. हा (पुन्हा पुन्हा न जन्मणारा) अजन्म, चिरकालीन, शाश्वत आणि प्राचीन (अनादि) असा आहे. शरीर नष्ट झाले म्हणून तो नष्ट होत नाही.

---

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम्। कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम्।।2.21।।

हे पार्थ! यः एनम् अविनाशिनम् नित्यम् अजम् अव्ययम् वेद, सः पुरुषः कथम् कम् घातयति, कम् हन्ति ?

हे पार्थ!

यः जो यद् पु. प्र. ए. व.

एनम् ह्या इदम् पु. द्वि. ए. व.

अविनाशिनम् नाश न होणार्या

अ विनाशिन् पु. द्वि. ए. व.

नित्यम् नित्य पु. द्वि. ए. व.

अजम् जन्मरहीत अज पु. द्वि. ए. व.

अव्ययम् व्यय न होणारा अ व्यय पु. द्वि. ए. व.

वेद, जाणतो विद् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

पुरुषः पुरूष पु. प्र. ए. व.

कथम् कसे अव्यय

कम् कोणाला किम् पु. द्वि. ए. व.

घातयति, मारविणार हन् धातू णिच प्रत्यय कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

कम् कोणाला किम् पु. द्वि. ए. व.

हन्ति मारेल हन् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

एखादी गोष्ट पटवून देण्यासाठी पुन्हा पुन्हा सांगून ती मनावर ठसवून द्यावी लागते.

आत्म्याची सर्व वैशिष्ट्ये सांगून झाल्यावर अर्जुनाला वाटणारा विषाद संपवण्यासाठी परत एकदा ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो पुरुष ह्या आत्म्याचे नाश न होणारे, कायमस्वरूपी , कमी न होणारे वैशिष्ट्य जाणतो तो कसे कोणाकडून मारून घेईल? कसे कोणाला मारेल?

---

वासांसि जीर्णानि यथा विहाय नवानि गृह्णाति नरोऽपराणि।

तथा शरीराणि विहाय जीर्णा-न्यन्यानि संयाति नवानि देही।।2.22।।

यथा नरः जीर्णानि वासांसि विहाय, अपराणि नवानि गृह्णाति, तथा देही जीर्णानि शरीराणि विहाय अन्यानि नवानि संयाति।

यथा जसे अव्यय

नरः मनुष्य नर  पु. प्र. ए. व.

जीर्णानि जुनी झालेली

जीर्ण नपु. द्वि. ब. व.

वासांसि वस्त्रे

वासस् नपु. द्वि. ब. व.

विहाय, त्यागून

वि+हा धातू ल्यप प्रत्यय

अपराणि दुसरी

अपर नपु. द्वि. ब. व.

नवानि नवीन

नव नपु. द्वि. ब. व.

गृह्णाति, ग्रहण करतो

ग्रह धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तथा तसे अव्यय

देही देहधारी जीवात्मा

देहिन् पु. प्र. ए. व.

जीर्णानि जीर्ण नपु. द्वि. ब. व.

शरीराणि शरीरे शरीर नपु. द्वि. ब. व.

विहाय त्यागून वि+हा धातू ल्यप प्रत्यय

अन्यानि अन्य नपु. द्वि. ब. व.

नवानि नव नपु. द्वि. ब. व.

संयाति प्राप्त होतो सम+या धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

13 व्या श्लोकात आपण पुनर्जन्म ह्या संकल्पनेवर विस्ताराने चर्चा केली आहे. ह्या श्लोकात वस्त्राची उपमा देऊन, मरणाचे दुःख तर करायचे नाहीच उलट पुनर्जन्माचा आनंद साजरा करावा असे सुचवले आहे असे वाटते, कारण जीर्ण वस्त्रे टाकून देऊन नवीन वस्त्र परिधान करावयास मिळाली की कोणालाही आनंदच होतो. मग असाच आनंद पुनर्जन्मामुळे का होऊ नये बरे?

बरेचदा नवजात बालक स्वतःशीच हसत असते तर कधी त्याच्या चेहर्‍यावर रागीट भाव असतात. असे म्हणतात की त्याला आधीच्या जन्मातील गोष्टी आठवत असतात.

जातस्य हर्षभयशोक सम्प्रतिपत्तेः।। (न्यायशास्त्र-3.1.18)

जसे मनुष्य जुनी वस्त्रांचा त्याग करून नवीन वस्त्रे धारण करतो तसे जीवात्मा जुन्या शरीराचा त्याग करून नवीन शरीर धारण करतो.

---

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः। न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः।।2.23।।

एनम् शस्त्राणि न छिन्दन्ति, एनम् पावकः न दहति च एनम् आपः न क्लेदयन्ति, मारुतः न शोषयति।

एनम् हे इदम् पु. द्वि. ए. व.

शस्त्राणि शस्त्र नपु. प्र. ब. व.

न अव्यय

छिन्दन्ति, कापतात छिद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

एनम् हे इदम् पु. द्वि. ए. व.

पावकः आग पावक पु. प्र. ए. व.

न अव्यय

दहति जाळते दह धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

च सुद्धा अव्यय

एनम् हे इदम् पु. द्वि. ए. व.

आपः पाणी अप स्त्री. प्र. ब. व.

न अव्यय

क्लेदयन्ति, ओले करणे क्लिद् धातू णिच् प्रत्यय कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

मारुतः वायू मारूत पु. प्र. ए. व.

न अव्यय

शोषयति सुकवणे शुष् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

ह्या श्लोकात आत्म्याची आणखी वैशिष्ट्ये सांगितली आहेत असे म्हणण्यापेक्षा आत्मा नक्की कसा आहे ह्याची कल्पना ह्या श्लोकामुळे येते.  कोणत्याही व्यक्तीच्या चालण्याबोलण्याने, चेहऱ्यावरील हावभावांमुळे तीचे सौंदर्य जाणवते. एखादे सुंदर शरीर अचेतन असेल तर ते मात्र आनंददायी नसते.

पृथ्वी जल, वायू, आकाश आणि अग्नी ह्या पंचमहाभूतांपैकी आकाश सोडून बाकी तत्वांचा उल्लेख येथे केला जे आत्म्यावर काहीही परीणाम करू शकत नाही. अवकाशात चेतना भरून राहिलेली असते. आत्मा आकाश तत्वांचा आहे असे सुद्धा म्हणता येईल,ज्यावर इतर चार तत्वांचा परीणाम होत नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

शस्त्र ह्या आत्म्याला कापू शकत नाही, अग्नी ह्याला जाळू शकत नाही पाण्यामुळे हा ओला होत नाही (सडून जात नाही) आणि वायू ह्याला सुकवून टाकत नाही.

---

अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च। नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः।।2.24।।

अयम् अच्छेद्यः, अयम् अदाह्यः, अक्लेद्यः, अशोष्यः च । अयम् नित्यः, सर्वगतः, स्थाणुः, अचलः, सनातनः एव।

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अच्छेद्यः, अभेद्य अ छिद् धातू ण्यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अदाह्यः, न जळणारा अ दह् धातू ण्यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

अक्लेद्यः, अविद्राव्य

अ क्लिद् धातू ण्यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

अशोष्यः न विरघळणारा अ शुष् धातू ण्यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

नित्यः, शाश्वत नित्य पु. प्र. ए. व.

सर्वगतः, सर्वव्यापी सर्व गत पु. प्र. ए. व.

स्थाणुः, स्थिर स्थाणु पु. प्र. ए. व.

अचलः, निश्चल अचल पु. प्र. ए. व.

सनातनः चिरकालीन सनातन पु. प्र. ए. व.

एव सुद्धा अव्यय

आधीच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे आत्मा पंचभूतांपैकी चार तत्वांनी अजिबात नाश पावत नाही. म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हा आत्मा अभेद्य, अज्वलनशील, पाणी शोषून न घेणारा आणि सुकवला न जाईल असा आहे. हा नित्य, सर्वव्यापी, स्थिर, अचल आणि सनातन असा आहे.

---

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते।तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि।।2.25।।

अयम् अव्यक्तः, अयम् अचिन्त्यः, अयम् अविकार्यः उच्यते। तस्मात् एनम् एवम् विदित्वा अनुशोचितुम् न अर्हसि।

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अव्यक्तः अप्रकट अव्यक्त पु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अचिन्त्यः अकल्पनीय अचिन्त्य चिन्त् धातू स्मरण करणे पु. प्र. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

अविकार्यः अपरिवर्तनीय अविकार्य अ+वि+कार्य कृ धातू ण्यत् प्रत्यय  पु. प्र. ए. व.

उच्यते म्हणतात वच् धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

एनम् इदम् पु. द्वि. ए. व.

एवम् असे अव्यय

विदित्वा जाणून विद् धातू जाणणे क्त्वा प्रत्यय

अनुशोचितुम् शोक करून अनु+शुच् धातू शोक करणे तुमून प्रत्यय

न अव्यय

अर्हसि योग्य आहे अर्ह धातू योग्य असणे कर्तरि लट लकार म.पु.ए.व.

प्रत्येक गोष्ट दाखवता येत नाही पण ती असते, जसे वारा. जी गोष्ट डोळ्यांना दिसतच नाही, तिच्या मध्ये कोणकोणते बदल होत असतात हे समजणार तरी कसे? त्या दृष्टीने ती अपरिवर्तनीय असते. आपण त्यात बदल घडवून आणणे केवळ अशक्य. अशा अनाकलनीय आत्म्याचे वर्णन ह्या श्लोकात केले आहे.

इन्द्रियेभ्यः परा ह्यर्था अर्थेभ्यश्च परं मनः।

मनसस्तु परा बुद्धिर्बुद्धेरात्मा महान्परः।।कठोपनिषद्-1.3.10

"इन्द्रियांपेक्षा श्रेष्ठ इन्द्रियांचे विषय, इन्द्रियांच्या विषयांपेक्षा सूक्ष्म असते मन, मनापेक्षा श्रेष्ठ बुद्धि आणि बुद्धि पेक्षा सूक्ष्म आत्मा असतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हा आत्मा अप्रकट, अनाकलनीय आणि अपरिवर्तनीय आहे, म्हणून ह्याला असे जाणून घेतल्यानंतर शोक करणे उचित नाही.

---

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम्। तथापि त्वं महाबाहो नैवं शोचितुमर्हसि।।2.26।।

अथ च एनम् नित्य-जातम्, नित्यम् वा मृतम् मन्यसे, तथा अपि हे महा-बाहो! त्वम् एवम् शोचितुम् न अर्हसि।

अथ परन्तु अव्यय

च जर अव्यय

एनम् हा इदम् पु. द्वि. ए. व.

नित्य-जातम्, नेहमी जन्माला येणारा नित्य जात पु. द्वि. ए. व.

नित्यम् नेहमी नित्य नपु. द्वि. ए. व.

वा अव्यय

मृतम् मरणारा मृत नपु. द्वि. ए. व.

मन्यसे, मानत असशील मन् धातू कर्तरि लट लकार म.पु.ए.व.

तथा तरी

अपि सुद्धा

हे महा-बाहो!

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

एवम् असा

शोचितुम् शोक करणे शुच् धातू तुमून प्रत्यय

न अर्हसि योग्य नाही अर्ह् धातू कर्तरि लट लकार म.पु.ए.व.

आत्म्याची अनेक वैशिष्ट्ये आतापर्यंतच्या श्लोकात आपण वाचली. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणत आहेत की

हे महा-बाहो! परन्तु तू आत्म्याला नेहमी जन्म घेणारा आणि नेहमी मरणारा असे मानत असशील, तरीसुद्धा तू अशा रीतीने शोक करणे योग्य नाही.

---

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।

तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि।।2.27।।

हि जातस्य मृत्युः ध्रुवः, मृतस्य जन्म च ध्रुवम्, तस्मात् अपरिहार्ये अर्थे त्वम् शोचितुम् न अर्हसि।

हि अव्यय म्हणून

जातस्य जन्मास आलेल्यास जात पु. ष. ए. व.

मृत्युः मृत्यु पु. प्र. ए. व.

ध्रुवः अटळ ध्रुव पु. प्र. ए. व.

मृतस्य मृतास मृत नपु. ष. ए. व.

जन्म जन्मन् नपु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

ध्रुवम्, अटळ ध्रुव नपु. प्र. ए. व.

तस्मात् तद् पु. पं. ए. व.

अपरिहार्ये अर्थे टाळता न येणाऱ्या परीस्थितीनुसार अपरिहार्य पु. स. ए. व.

अ+परी +हृ धातू + ण्यत् प्रत्यय

परी +हृ धातू त्याग करणे

अर्थे अर्थ पु. स. ए. व.

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

शोचितुम् शोक करणे

शुच् धातू तुमून प्रत्यय

न अर्हसि योग्य नाही

अर्ह धातू कर्तरि लट लकार म.पु.ए.व.

ह्या पृथ्वीवर जन्मदर आणि मृत्यूदर यांचा समतोल राखला गेलाच पाहिजे. जन्मदराच्या खूप पटीने जास्त मृत्यू झाले तर येथील जीवन संपून जाईल. किंवा ह्याच्या उलट झाले तर वृद्धांची संख्या प्रचंड वाढेल. आणि त्यांची काळजी घेण्यासाठी तरूण पिढी असणार नाही आणि कालांतराने ह्या पृथ्वीवरील जीवन नष्ट होईल. हे व्यावहारिक सत्य ह्या श्लोकाचा तत्वज्ञानाच्या अंगाने मांडले आहे.

महाभारतातील धर्मराजानी सांगितलेल्या श्लोकाची येथे आठवण आल्याशिवाय रहात नाही.

अहन्यहनि भूतानि गच्छन्तीह यमालयम्।

शेषाः स्थिरत्वम् इच्छन्ति किमाश्चर्यमतः परम् ।। (महाभारत)

"क्षणोक्षणी लोक मृत्युमुखी पडतात आणि बाकीचे हे पहात असतात. ते सुद्धा एक दिवस मृत्यू पावणार आहेत हे मात्र त्यांच्या ध्यानात येत नाही. ह्या पेक्षा आश्चर्यजनक अजून काय असेल?

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

जन्म घेणाऱ्याचा मृत्यू अटळ आहे आणि मृत झालेल्याचा जन्म अटळ आहे. ज्या गोष्टी अपरिहार्य आहेत त्यावर तू दुःख करत बसणे योग्य नाही.

---

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।

अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना।।2.28।।

हे भारत! भूतानि अव्यक्त-आदीनि अव्यक्त-निधनानि व्यक्त-मध्यानि एव, तत्र का परिदेवना?

हे भारत! हे अर्जुन

भूतानि सर्व जीव भूत नपु. प्र ब. व.

अव्यक्त-आदीनि जन्मापूर्वी अव्यक्त

अव्यक्त आदीन् नपु. प्र. ब. व.

अव्यक्त-निधनानि मरणानंतर अव्यक्त

अव्यक्त निधन नपु. प्र. ब. व. व्यक्त-मध्यानि (शरीररूपी) मध्ये व्यक्त

व्यक्त मध्य नपु. प्र. ब. व.

एव सुद्धा अव्यय

तत्र तेथे अव्यय

का काय किम् स्त्री. प्र. ए. व.

परिदेवना शोक करायचा परि+दिव् धातू शोक करणे ल्युट प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

आतापर्यंत च्या श्लोकात आपण आत्म्याची वैशिष्ट्ये वाचली. शरीर नाशवंत आहे हे सुद्धा आपण वाचले. ह्या श्लोकात प्रथमच व्यक्त आणि अव्यक्त आत्मा ह्यावर भाष्य केले आहे. अगदी सरळ सरळ भूत आत्मा असा उल्लेख केला नसून अव्यक्त आत्मा असे म्हटले आहे. ह्या श्लोकातून विचारांना एक नवीन चालना मिळते. भूतप्रेत अस्तित्वात असतात का? भारतीय लोकांच्या मनात ह्याविषयी बऱ्याच समजूती आहेत, तशाच त्या पाश्चात्य लोकांच्या मनात सुद्धा आहेत. ह्यावर शास्त्रोक्त पद्धतीने अभ्यास करण्याचा खटाटोप चालू असतो त्याला

Paranormal Science असे म्हटले जाते. जे सामान्य पणे आपल्याला दिसते /समजते ते नॉर्मल. जे सामान्य च्या पलिकडे आहे ते Paranormal.

भारतात सुद्धा अशी Paranormal studies नावाची संस्था आहे.

गीतेच्या 9 व्या अध्यायातील 25 व्या श्लोकात पितरांचा उल्लेख आहे.

यान्ति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः।

भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम्।।9.25।।

गरूड पुराणात मृत्यूनंतरच्या परिस्थितीबद्दल आणि स्वर्ग-नरक आणि पितृलोकाबद्दल बरेच काही सांगितले गेले आहे. यासह, जीवात्मा, प्रेतात्मा आणि सूक्ष्मात्मा याच्यातील फरक देखील सांगितला गेला. ह्या सर्वांना यम, शाकिनी, डाकिनी, चुड़ैल, भूत, प्रेत, राक्षस आणि पिशाच अशा अनेक संज्ञा आहेत.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

हे भारत सर्व जीव जन्मापूर्वी अप्रकट असतात आणि मरणानंतर ही अप्रकट असतात, फक्त मधल्या काळात प्रकट असतात, मग अशा स्थितीत शोक कशासाठी करायचा?

---

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन

माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः।

आश्चर्यवच्चैनमन्यः श्रृणोति

श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित्।।2.29।।

कश्चित् एनम् आश्चर्यवत् पश्यति, तथा एव च अन्यः आश्चर्यवत् वदति, अन्यः च एनम् आश्चर्यवत् शृणोति; न कश्चित् च श्रुत्वा अपि एनम् वेद एव।

कश्चित् कोणीतरी किञ्चित पु. प्र. ए. व.

एनम् ह्या ला इदम् पु. द्वि. ए. व.

आश्चर्यवत् आश्चर्याने अव्यय

पश्यति, पाहतो दृश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तथा तसे अव्यय

तथा एव च आणि त्याचप्रमाणे

एव अव्यय

च सुद्धा अव्यय

अन्यः अन्य पु. प्र. ए. व.

आश्चर्यवत् आश्चर्याने

वदति, म्हणतो वद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अन्यः अन्य पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

एनम् ह्याला इदम् पु. द्वि. ए. व.

आश्चर्यवत् आश्चर्याने अव्यय

शृणोति; ऐकतो श्रु धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

कश्चित् कोणीतरी किञ्चित पु. प्र. ए. व.

च सुद्धा अव्यय

श्रुत्वा ऐकून श्रु धातू क्त्वा प्रत्यय

अपि सुद्धा अव्यय

एनम् ह्याला इदम् पु. द्वि. ए. व.

न अव्यय

वेद जाणत नाही विद् धातू कर्तरि लट लकार उ. पु. ए. व.

एव अव्यय

सामान्य माणसे आणि ज्ञानी, प्रतिभाशाली माणसे ह्यात फरक कायम राहणारच. कलेच्या क्षेत्रात हे नेहमीच पहावयास मिळते. प्रतिभावंत कलाकारांचे शिष्य तेवढेच प्रतिभावान घडतात असे नाही. अध्यात्मिक ज्ञान सुद्धा असेच आहे. गुरू आपल्या शिष्यांना एका मर्यादेपर्यंत ज्ञान देऊ शकतो. अध्यात्मिक प्रगती ही ज्याची त्यानेच करायची असते.

श्रवणायापि बहुभियर्यो न लभ्यः श्रृण्वन्तोऽपि बहवो यं न विद्युः। आश्चर्यो वक्ता कुशलोऽस्य लब्धाश्चर्यो ज्ञाता कुशलानुशिष्टः।।कठोपनिषद्-1.2.7

एका आत्मज्ञानी गुरूची भेट होणे दुर्लभ आहे. आत्मज्ञान देणाऱ्या गुरूला ऐकण्याची संधी मिळणे सुद्धा दुर्लभ. आणि कधी असे घडलेच तर असा शिष्य विरळाच जो गुरू कडून हे ज्ञान आत्मसात करू शकेल.

आत्मज्ञान झालेला, परमेश्वराशी एकरूप झालेली व्यक्ती रूढ अर्थाने सामान्य जगात रहात नाही, असे सांगताना श्रीज्ञानेश्वर माऊली म्हणतात की

जैसा सरिता ओघ समस्त । समुद्रामाजिं मिळत ।

परी माघौते न समात । परतले नाहीं ॥ १७५ ॥

जशी नदी समुद्राला मिळते आणि परत माघारी येत नाही.

ह्या श्लोकात आश्चर्य असा शब्द वापरला आहे. आश्चर्य तेव्हाच वाटते जेव्हा एखादी गोष्ट आपल्या कल्पनेच्या पलिकडची असते. ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

ह्या (आत्म्याला) कोणी आश्चर्याने पाहतो, तर अन्य कोणी आश्चर्याने बोलतात. काही जण आश्चर्याने ऐकतात, आणि ऐकून सुद्धा काहीच समजून घेत नाहीत.

---

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत।

तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि।।2.30।।

हे भारत! सर्वस्य देहे अयम् देही नित्यम् अवध्यः; तस्मात् त्वम् सर्वाणि भूतानि (उद्दिश्य) शोचितुम् न अर्हसि।

हे भारत!

सर्वस्य सर्वांचे सर्व पु. ष. ए. व.

देहे शरीरात देह नपु. स. ए. व.

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

देही आत्मा देहीन् पु. प्र. ए. व.

नित्यम् नेहमीच नित्य नपु. द्वि. ए. व.

अवध्यः न मरणारा अवध्य हन् धातू यत् प्रत्यय पु. प्र. ए. व.

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

सर्वाणि सर्व नपु. द्वि. ब. व.

भूतानि जीवांसाठी भूत नपु. द्वि. ब. व.

शोचितुम् शोक करून शुच् धातू तुमून प्रत्यय

न अर्हसि योग्य नाही अर्ह धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

दुसर्‍या अध्यायाच्या सुरवातीला अर्जुनाच्या कुटुंबाच्या वियोगाचे दुःख आणि गुरूजनांच्या हत्येमुळे लागणार्‍या पापाची भीती अशा संमिश्र भावनांचा निचरा करण्यासाठी श्रीभगवानकृष्णांनी अकराव्या श्लोकापासून आतापर्यंत निरनिराळ्या प्रकारे उपदेश देत देत आत्म्याचे खरे स्वरूप उलगडून दाखविले. अवध्य शब्दाचे दोन अर्थ होतात जसे मारण्यास अयोग्य (खरे तर मारणे नेहमी अयोग्यच) आणि न मरणारे. आत्मा अविनाशी आहे असे आधीच्या श्लोकात सांगून झाले आहेच.

ह्या ठिकाणी स्वातंत्र्यवीरांच्या ओळींची आठवण होते.

अनादि मी अनंत मी अवध्य मी भला | मारिल रिपु जगति असा कवण जन्मला ||ध्रु||

आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे भारत! हा आत्मा सर्वांच्या शरीरात नेहमीच अवध्य आहे. म्हणून सर्व जीवांसाठी तू दुःख करत बसणे उचित नाही.

---

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि।

धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते।।2.31।।

स्वधर्मम् अपि च अवेक्ष्य विकम्पितुम् न अर्हसि। हि धर्म्यात् युद्धात् क्षत्रियस्य अन्यत् श्रेयः न विद्यते

स्वधर्मम् स्व+धर्म पु. द्वि. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

च सुद्धा अव्यय

अवेक्ष्य पाहून अव+ईक्ष धातू ल्यप प्रत्यय

विकम्पितुम् थरथर कापत वि+कम्प् धातू तुमून प्रत्यय

न अर्हसि योग्य नाही अर्ह धातू कर्तरि लट लकार म. पु. ए. व.

हि कारण अव्यय

धर्म्यात् धर्म धर्म्य पु. पं. ए. व.

युद्धात् (धर्मयुदध) युद्ध नपु. पं. ए. व.

क्षत्रियस्य क्षत्रिय पु. ष. ए. व.

अन्यत् अन्य नपु. प्र. ए. व.

श्रेयः श्रेष्ठ श्रेय नपु. प्र. ए. व.

न विद्यते नाही विद् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला क्षत्रिय धर्माचे कर्तव्य सांगत असताना , धर्म म्हणजे काय हे आपणही समजून घ्यायला हवे. आपला सहज नैसर्गिक स्वभाव म्हणजे धर्म. जसे अग्नी चा धर्म आहे जळणे आणि जाळणे. बर्फाचा धर्म आहे शीतलता. धर्म चा दुसरा अर्थ आहे कर्तव्य. एकाच व्यक्तीचे अनेक धर्म असतात जसे पुत्र म्हणून आईवडीलांचा आदर, पिता म्हणून मुलाबाळांची काळजी आणि प्रेम. उत्तम नागरीक म्हणून देशसेवा. वगैरे. आधुनिक काळात धर्म म्हणजे लोकांची श्रद्धेनुसार विभागणी असा संकुचित विचार निर्माण झाला.

शौर्य, तेज, धृति, दक्षता, युद्धातून पलायन न करणे, दान आणि ईश्वर भाव हे सर्व क्षत्रियांची स्वाभाविक कर्मे आहेत असे श्रीमद्भगवद्गीतेच्या 18 व्या अध्यायातील 43 व्या श्लोकात सांगितले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

तुझ्या स्वधर्माचा (क्षत्रिय धर्म) विचार करून (पाहून) विचलित होणे योग्य होणार नाही कारण धर्मयुद्धापेक्षा श्रेष्ठ असे क्षत्रियासाठी काहीही नाही.

---

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम्।

सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम्।।2.32।।

हे पार्थ! यदृच्छया स्वर्ग-द्वारम् अपावृतम् उपपन्नम् च ईदृशम् युद्धम् सुखिनः क्षत्रियाः लभन्ते।

हे पार्थ!

यदृच्छया अकस्मात यदृच्छा स्त्री तृ. ए. व.

यत्+ऋच्छया ऋच्छ् धातू जाणे

स्वर्ग-द्वारम् स्वर्गाचे द्वार स्वर्ग-द्वार नपु. द्वि. ए. व.

अपावृतम् उघडलेले अप+आ+वृत् धातू क्त प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

उपपन्नम् प्राप्त झालेले उप+पद् धातू क्त प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

च सुद्धा अव्यय

ईदृशम् अशाप्रकारचे ईदृश् नपु. द्वि. ए. व.

युद्धम् युद्ध नपु. द्वि. ए. व.

सुखिनः भाग्यवान सुखिन् पु. प्र. ब. व.

क्षत्रियाः क्षत्रियाला क्षत्रिय पु. प्र. ब. व.

लभन्ते लाभते लभ् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

श्रीमद्भगवद्गीतेतील श्लोक समजून घेताना बरेचदा भक्तीमार्गाचा अवलंब करून, कर्मांचा त्याग करावा असा अर्थ काढला जातो. ह्या श्लोकावरून त्या मुद्द्यावर स्पष्टता येते. आपले कर्तव्यपालन करून स्वर्ग प्राप्तीची अपेक्षा करता येते असेच ह्या श्लोकात सुचवले आहे.

भारतीय आंतरराष्ट्रीय युद्धनीतीनुसार आपण स्वतःहून कधीच दुसर्‍या देशावर युद्धाक्रमण करायचे नाही असे धोरणात्मक ठरवलेले आहे. ते आपल्या भारतीय तत्वज्ञानाशी सुसंगत आहे असे ह्या श्लोकावरून वाटते. बर्‍याच वाटाघाटी असफल झाल्यानंतर पांडवांनी कौरवांच्या विरूद्ध लढण्याचा निर्णय घेतला. श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला गीता सांगितली, त्यावेळी धृतराष्ट्र सुद्धा ती ऐकत होते तरीही त्यांनी युद्ध थांबवण्याचा आदेश दिला नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे पार्थ! स्वर्गप्राप्तीचे द्वार खुले करणारी अशी समोरून आलेल्या युद्धाची संधी भाग्यवान क्षत्रियांनाच लाभते.

---

अथ चैत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि। ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि।।2.33।।

अथ त्वम् इमम् धर्म्यम् सङ्ग्रामम् न करिष्यसि चेत्, ततः स्वधर्मम् कीर्तिम् च हित्वा पापम् अवाप्स्यसि

अथ आता अव्यय

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

इमम् हे इदम् पु. द्वि. ए. व.

धर्म्यम् धर्म धर्म्य पु. द्वि. ए. व.

सङ्ग्रामम् युद्ध सङ्ग्राम पु. द्वि. ए. व.

न अव्यय

करिष्यसि करशील कृ धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

चेत्, जर अव्यय

ततः तर मग अव्यय

स्वधर्मम् स्वधर्म पु. द्वि. ए. व.

कीर्तिम् कीर्ति स्त्री. द्वि. ए.  व.

च सुद्धा अव्यय

हित्वा गमावून हा धातू त्याग करणे क्त्वा प्रत्यय

पापम् पाप नपु. द्वि. ए. व.

अवाप्स्यसि प्राप्त होईल अव+आप धातू व्यापणे कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

युद्धभूमीवर कोणाचा तरी मृत्यू अटळच. हे माहीत असूनही निधडे पणाने लढायला जाणे ही धैर्याची परीसीमा.

क्षत्रियोः हि प्रजा रक्षन्शस्त्रपाणिः प्रदण्डवान्।

निर्जित्यपरसैन्यादि क्षितिमं धर्मेणपालयेत् ।।

पराशर स्मृति-1.61

एका सैनिकाचा धर्म आपल्या देशातील नागरिकांचे आक्रमण आणि उपद्रवापासून रक्षा करणे हे आहे.

युद्धभूमी वरून युद्ध न करताच परत फिरणे म्हणजे पळपुटेपणा. अशी नामुष्की अर्जुनावर येऊ नये असे श्रीभगवानकृष्णांना नक्कीच वाटते आहे. त्याही पुढे जाऊन श्रीभगवानकृष्ण ह्याला पापकर्म म्हणत आहेत.

ह्या श्लोकात आपले निहीत कर्म प्रामाणिकपणे करण्याचे महत्त्व समजावून सांगताना

श्रीभगवानकृष्ण ह्या श्लोकात असे म्हणतात की

आता जर तू हे धर्मयुद्ध केले नाहीस तर तू स्वधर्म आणि कीर्ती गमावून बसशील आणि तुला पाप लागेल.

---

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम्।

संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते।।2.34।।

अपि च भूतानि ते अव्ययाम् अकीर्तिम् कथयिष्यन्ति। सम्भावितस्य च अकीर्तिः मरणात् अतिरिच्यते

अपि सुद्धा अव्यय

च आणि अव्यय

भूतानि सर्व जीव भूत नपु. प्र. ब. व.

ते तुझे युष्मद् ष. ए. व.

अव्ययाम् चिरकालीन अ+व्यया स्त्री. द्वि. ए. व.

अकीर्तिम् बदनामी अ+कीर्ति स्त्री. द्वि. ए. व.

कथयिष्यन्ति सांगतील कथ धातू कर्तरि लृट लकार परस्मैपदी प्र. पु. ब. व.

सम्भावितस्य आदरणीय लोकांसाठी

सम+भू क्त प्रत्यय पु. ष. ए. व.

च आणि अव्यय

अकीर्तिः बदनामी अ+कीर्ति स्त्री. प्र. ए. व.

मरणात् मरणापेक्षा मरण नपु. पं. ए. व.

अतिरिच्यते अधिक असते अति+रिच धातू पसरणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

नावात काय आहे असे प्रसिद्ध वाक्य आहे जे ह्या श्लोकाने चुकीचे ठरते आहे असे वाटते. नावातच सर्व काही आहे.

पुढे येणाऱ्या अध्यायात श्रीभगवानकृष्णांनी स्पष्टपणे अर्जुनाला म्हटले आहे की आपल्या दोघांचे आधी बरेच जन्म होऊन गेले आहेत (पण ह्या जन्मात आपले नाव अजरामर झाले) जे तुला माहित नाही.

ह्या अध्यायात युद्ध करणे कसे योग्य आहे ते श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला पटवून देत आहेत.

आधीच्या श्लोकात तू जर तुझा क्षत्रिय धर्म पाळला नाहीस तर तुला पाप लागेल असे सांगितले आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

आणि सर्वजण तुझी वर्षानुवर्षे अपकीर्ती पसरवत राहतील, जे प्रतिष्ठीत व्यक्ती साठी मरणयातना पेक्षा भयंकर आहे.

---

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः। येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम्।।2.35।।

येषाम् च त्वम् बहुमतः महारथाः त्वाम् भयात् रणात् उपरतम् मंस्यन्ते; भूत्वा, लाघवम् यास्यसि

येषाम् ज्यांचे यद् पु. ष. ब. व.

च आणि अव्यय

त्वम् तू युष्मद् प्र. ए. व.

बहुमतः प्रसिद्ध बहुमत पु. प्र. ए. व.

महारथाः विद्वान महारथ पु. प्र. ब. व.

त्वाम् तुला युष्मद् द्वि. ए. व.

भयात् भीतीने भय नपु. पं. ए. व.

रणात् युद्ध भूमीपासून रण नपु. पं. ए. व.

उपरतम् मागे फिरणे उप+रम् धातू रमणे क्त प्रत्यय नपु. द्वि. ए. व.

मंस्यन्ते; मानतील मन् धातू मानणे कर्तरि लृट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

भूत्वा, होऊन भू धातू होणे क्त्वा प्रत्यय

लाघवम् क्षुद्र लाघव नपु. द्वि. ए. व.

यास्यसि प्राप्त होईल

या धातू प्राप्त होणे कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

ह्या श्लोकात महारथी असा शब्द वापरला आहे. त्याचा अर्थ ब्रह्मास्त्र विद्येचा जाणकार, प्रकांड पंडित, कुशल राजनीती व रणनीतीज्ञ. अशा विद्वानांची मर्जी राखणे ही त्याकाळातील सामाजिक रीत असावी. अर्जुन हा द्रोणाचार्यांचा प्रिय शिष्य होता. स्वतःच्या अंगभूत गुणांनी त्याने स्वतःची अशी प्रतिमा तयार केली होती.

कोणतीही नवीन गोष्ट सुरू करण्यापूर्वी त्याचा सर्व दृष्टीने विचार करूनच ती पुढे न्यावी लागते. आणि त्यानंतर माघार घेता येत नाही नाहीतर ती व्यक्ती आपली विश्वासार्हता गमावून बसते. कोणत्याही व्यवसायात विश्वास सर्वात महत्त्वाचा. धरसोडवृत्ती असलेली व्यक्ती आयुष्यात सफल होऊ शकत नाही. असा जणू व्यवस्थापनाचा धडाच श्रीभगवानकृष्णांनी ह्या श्लोकात दिला आहे.

ते असे म्हणतात की

ज्या महारथींनी तुझ्या यशाची वाखाणणी केली आहे, त्यांचा असा समज होईल की भीतीपोटी तू रणांगणापासून दूर जात आहेस आणि त्यामुळे ते तुला तुच्छ समजतील.

---

अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः।

निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम्।।2.36।।

तव अहिताः तव सामर्थ्यम् निन्दन्तः बहून् अवाच्य-वादान् च वदिष्यन्ति। ततः दुःखतरम् किम् नु?

तव तुझे युष्मद् ष. ए. व.

अहिताः वैरी अहित पु. प्र. ब. व.

तव तुझे युष्मद् ष. ए. व.

सामर्थ्यम् सामर्थ्य नपु. द्वि. ए. व.

निन्दन्तः निंदनीय

निन्द् धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ब. व.

बहून् बरेच बहू पु. द्वि. ब. व.

अवाच्य-वादान् अयोग्य वचन

अवाच्य वाद पु. द्वि. ब. व.

च आणि अव्यय

वदिष्यन्ति म्हणतील वद् कर्तरि लृट लकार प्र पु. ब. व.

ततः त्यापेक्षा अव्यय

दुःखतरम् दुःखदायक दुःखतर नपु. प्र. ए. व.

किम् अव्यय आणि काय?

नु अव्यय

युद्ध न करण्यामुळे, त्याचे काय काय परीणाम होऊ शकतील हे सांगणारा हा चवथा श्लोक. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

तुझे वैरी तुझ्या सामर्थ्याची निंदा करता करता बरेचसे अयोग्य असे काहीबाही बोलतील. ह्यापेक्षा आणखी दुःखदायक काय असेल बरे?

---

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।

तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः।।2.37।।

हतः वा स्वर्गम् प्राप्स्यसि, जित्वा वा महीम् भोक्ष्यसे। तस्मात् हे कौन्तेय! युद्धाय कृत-निश्चयः उत्तिष्ठ

हतः मारले गेल्यावर

हन् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

वा किंवा अव्यय

स्वर्गम् स्वर्ग पु. द्वि. ए. व.

प्राप्स्यसि, प्राप्त करशील प्र+आप धातू प्राप्त करणे कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

जित्वा जिंकून जि धातू जिंकणे क्त्वा प्रत्यय

वा किंवा अव्यय

महीम् पृथ्वी मही स्त्री. द्वि. ए. व.

मह् धातू पूजा करणे

भोक्ष्यसे भोगशील भुज् धातू भक्षण करणे कर्तरि लृट लकार आत्मनेपदी मी. पु. ए. व.

तस्मात् म्हणून तद् नपु. पं. ए. व.

हे कौन्तेय!

युद्धाय युद्धासाठी युद्ध नपु. च. ए. व.

कृत-निश्चयः निश्चय करून कृत-निश्चय पु. प्र. ए. व.

उत्तिष्ठ उभा रहा उद्+स्था धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

आता ह्या पुढील श्लोकात युद्ध करण्याचे परीणाम सांगायला सुरुवात केली आहे. अर्थात 32 व्या श्लोकात म्हटल्याप्रमाणे युद्ध करण्यासारखी परीस्थिती निर्माण झाल्याने युद्ध करावे लागते आहे.

श्रीभगवानकृष्ण स्वतः परमेश्वर असल्याने त्यांना युद्धाचे परीणाम माहीत आहेत तरी सुद्धा एकेक मुद्दा उलगडून, ते अर्जुनाला युद्ध करणे कसे योग्य आहे ते समजावून सांगत आहेत. समुपदेशनाचा आदर्श नमुना ह्या ठिकाणी सादर होत आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

जर तू युद्धात मारला गेलास तर तुला स्वर्ग प्राप्ती होईल, जर जिंकलास तर ह्या पृथ्वीवर (राज्य) उपभोगशील. म्हणून हे कौन्तेय! युद्ध करण्याचा निश्चय करून उभा रहा.

---

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ।

ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि।।2.38।।

जय-अजयौ लाभ-अलाभौ सुख-दुःखे समे कृत्वा ततः युद्धाय युज्यस्व। एवम् पापम् न अवाप्स्यसि

जय-अजयौ जयपराजय जय-अजय पु. द्वि. द्वि. व.

लाभ-अलाभौ लाभ आणि हानि

लाभ अलाभ पु. द्वि. द्वि. व.

सुख-दुःखे सुख-दुःख नपु. द्वि. द्वि. व.

समे समान सम नपु. द्वि. द्वि. व.

कृत्वा कृ धातू क्त्वा प्रत्यय

ततः म्हणून अव्यय

युद्धाय युद्धासाठी युद्ध नपु. च. ए. व.

युज्यस्व युद्धाला तयार हो युज् धातू भावे प्रयोग लोट लकार म. पु. ए. व.

एवम् असे केल्याने अव्यय

पापम् पाप नपु. द्वि. ए. व.

न अव्यय

अवाप्स्यसि प्राप्त होईल अव+आप धातू प्राप्त होणे कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

कर्तव्य पालन मग आपल्याला ते पटो अथवा न पटो असा महत्वपूर्ण संदेश ह्या श्लोकात दिला आहे.

आपली वैयक्तिक मते, भावभावना कर्तव्याच्या आड येऊ देऊ नये हा आपल्या रोजच्या जीवनासाठी सुद्धा महत्वाचा संदेश.

असे सांगताना कर्मयोगाची सुद्धा वैशिष्ट्ये सांगितली आहेत. प्रत्येक गोष्टीत आपण समता भाव राखला पाहिजे. ह्याबद्दल आगामी अध्यायात विस्ताराने लिहिले गेले आहे.

पुण्येन पुण्य लोकं नयति पापेन पापमुभाभ्यामेव मनुष्यलोकम्। प्रश्नोपनिषद् तृतीय प्रश्न 7वा श्लोक.

पुण्यकारक कर्मे करणाऱ्या जीवात्म्याला पुण्यमय स्वर्गलोक प्राप्त होतो आणि पापमय कर्मे करणाऱ्या जीवात्म्याला हीन योनीत जन्म प्राप्त होतो. पुण्य आणि पाप समान असतील त्यांना पुन्हा मनुष्यलोकातच जन्म प्राप्त होतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जय-पराजय, लाभ-हानि आणि सुख-दुःख ह्याकडे सम दृष्टीने पाहून युद्ध करायला तयार हो. असे केल्याने तुला पाप लागणार नाही.

---

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु।

बुद्ध्यायुक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि।।2.39।।

हे पार्थ! एषा बुद्धिः ते साङ्ख्ये अभिहिता; इमाम् तु योगे शृणु। यया बुद्ध्या युक्तः कर्म-बन्धम् प्रहास्यसि

हे पार्थ!

एषा हि एतद् स्त्री. प्र. ए. व.

बुद्धिः बुद्धि बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

ते तुझे युष्मद् च. ए. व.

साङ्ख्ये ज्ञान साङ्ख्य नपु. स. ए. व.

सम+ख्या धातू गणना करणे

अभिहिता; सांगितलेले अभि+धा धातू धारण करणे क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

इमाम् ही (बुद्धि) इदम् स्त्री. द्वि. ए. व.

तु परन्तु अव्यय

योगे (कर्म)योग पु. स. ए. व.

शृणु ऐक श्रु धातू ऐकणे कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

यया जी यद् स्त्री तृ. ए. व.

बुद्ध्या बुद्धि स्त्री. तृ. ए. व.

युक्तः प्राप्त झाली असता युज् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

कर्म-बन्धम् कर्माचा बंध कर्म-बन्ध पु. द्वि. ए. व.

प्रहास्यसि सोडून देशील प्र+हा धातू त्याग करणे कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

आतापर्यंत श्रीभगवानकृष्णांनी अर्जुनाला आत्म्याची अवध्य अद्भुत अव्यक्त अप्रकट अविनाशी अपरिवर्तनीय नित्य निश्चल अच्छेद्य अक्लेद्य अशोष्य सनातन अकल्पनीय अशी विविध वैशिष्ट्ये सांगितली.

प्रकृति आणि पुरुष ह्या दोन मूलभूत तत्वांचा अंगिकार करून द्वैतवादाचा पुरस्कार करणाऱ्या तत्वज्ञानाला सांख्य दर्शन असे म्हणतात. प्रकृति च्या प्रभावातून निर्माण होणारी 24 तत्त्वांचे  ज्ञान लोकांसमोर ठेवले गेले.

संख्यां प्रकुर्वते चैव प्रकृतिं च प्रचक्षते। तत्त्वानि च चतुर्विंशद् तेन सांख्याः प्रकीर्तिताः।

प्रकृती च्या प्रभावातून निर्माण झालेल्या ज्या 24 तत्वांना निर्धारित केले गेले आहे त्यांना सांख्य असे म्हणतात.

सांख्य-दर्शनाचा मुख्य आधार सत्कार्यवाद आहे, म्हणजे कार्यकारणभाव. कोणतीही गोष्ट कारणाशिवाय घडू शकत नाही.

महाभारतात सांख्य चा उल्लेख बरेचदा केलेला दिसून येतो.

ज्ञानं च लोके यदिहास्ति किञ्चित् सांख्यागतं तच्च महन्महात्मन् ।।शांति पर्व 301.109।।

ह्या लोकात जे काही ज्ञान आहे ते सांख्य मुळे आले आहे.

'ख्या' धातू पासून व्युत्पन्न झालेला सांख्य शब्द, ज्याचा अर्थ आहे 'सम्यक् ख्याति'.

सांख्य म्हणजे विवेक ज्ञान.

कपिलस्तत्त्वसंख्याता भगवानात्ममायया ।जातः स्वयमजः साक्षादात्मप्रज्ञप्तये नृणाम् ॥ श्रीमद्भागवतम् 3.25.1॥

परमेश्वराने कपिल मुनींच्या रूपात जन्म घेऊन लोकांच्या कल्याणासाठी सांख्य दर्शन सांगितले.

पुढील अध्यायात हळूहळू श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला निरनिराळ्या योगांचे पाठ देणार आहेत जसे ज्ञानयोग कर्मयोग आणि भक्तीयोग.

लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ। ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम्॥ श्रीमद्भगवद्गीता 3. 3॥

दोन प्रकारच्या निष्ठा माझ्याद्वारे सांगितल्या गेल्या आहेत. विद्वानांसाठी ज्ञानयोग (सांख्य) आणि कर्मयोगींसाठी कर्मयोग.

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पण्डिताः।

एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम्।।श्रीमद्भगवद्गीता 5.4।।

बालबुद्धि असलेले लोक सांख्य आणि (कर्म) योग ला भिन्न समजतात. कोणत्याही एका योग चा पुरस्कार करून सुद्धा तो व्यक्ती दोन्ही ची फळे प्राप्त करू शकतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! तुला सांख्य विषयक ज्ञान दिले गेले आता तू कर्मयोग बद्दल ऐक.  ते ज्ञान ऐकून तू कर्मबंधनांचा त्याग करशील.

---

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।

स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्।।2.40।।

इह अभिक्रम-नाशः न अस्ति, प्रत्यवायः न विद्यते, अस्य धर्मस्य स्वल्पम् अपि महतः भयात् त्रायते

इह अव्यय ह्यात

अभिक्रम-नाशः आरंभाचा नाश

अभिक्रम-नाश पु. प्र. ए. व.

अभि+क्रम् धातू सुरवात करणे

न अव्यय

अस्ति, असते अस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

प्रत्यवायः प्रतिकूल परीणाम प्रत्यवाय पु. प्र. ए. व.

प्रति+अव+इ धातू

अव+इ धातू जाणणे

न विद्यते, नाही विद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अस्य या इदम् पु. ष. ए. व.

धर्मस्य धर्माचे धर्म पु. ष. ए. व.

स्वल्पम् स्वल्प नपु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

महतः मोठे महत् नपु. पं. ए. व.

भयात् भयापासून

भय नपु. पं. ए. व.

त्रायते रक्षण करते

त्रै धातू पालन करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात श्रीभगवानकृष्णांनी कर्मयोगाचे सूतोवाच केले आहे आणि कर्मबंधनांचा त्याग करशील असे अर्जुनाला म्हटले आहे. तोच धागा पकडून ह्या श्लोकाचा अर्थ समजून घ्यायला हवा. स्वार्थरहीत, कर्तव्याच्या भावनेने केलेले समते च्या भावनेने केलेले कर्म म्हणजे कर्मयोग. कर्मफलसंन्यास हा कर्मयोगाचा गाभा होय. कोणतेही कार्य सुरू केले की ते पूर्णत्वास नेणे आवश्यक असते नाहीतर वेळ, पैसा आणि संसाधने वाया जाऊ शकतात. कर्मयोगाचे मात्र तसे नाही. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

ह्या कर्मयोगा मध्ये धर्माच्या आरंभाचा नाश होत नाही किंवा त्याच्या फलाचा उलटा परीणाम होत नाही. ह्याचा थोडासा प्रयत्न सुद्धा मोठ्या भितीयुक्त परीस्थितीपासून आपले रक्षण करतो.

---

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन।

बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम्।।2.41।।

हे कुरु-नन्दन ! इह एका व्यवसाय-आत्मिका बुद्धिः। अव्यवसायिनाम् बुद्धयः हि बहु-शाखाः अनन्ताः च

हे कुरु-नन्दन !

इह अव्यय ह्या (कर्मयोगात)

एका एकच एका स्त्री. प्र. ए. व.

व्यवसाय-आत्मिका व्यवसायनिष्ठ व्यवसाय-आत्मिका स्त्री. प्र. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

अव्यवसायिनाम् निष्ठा नसलेले

अ व्यवसायिन् पु. ष. ब. व.

बुद्धयः बुद्धि स्त्री. प्र. ब. व.

हि नक्कीच अव्यय

बहु-शाखाः अनेक शाखा बहुशाखा स्त्री. प्र. ब. व.

अनन्ताः अमर्याद अन् अन्ता स्त्री. प्र. ब. व.

च सुद्धा अव्यय

एकच व्यक्ती जर अनेक कामे करू शकत असेल तर त्या व्यक्तीकडे आजच्या काळात आदराने पाहिले जाते. कर्मयोगाचे वैशिष्ट्य सांगताना मात्र थोडा निराळा विचार मांडला आहे.

लक्ष्यपूर्ती साठी आवश्यक असणारी दृढता आणि मनाचा निग्रह ह्यालाच व्यवसायआत्मिक असे म्हणता येईल. अर्जुनाला दिसत असणाऱ्या पोपटाच्या डोळ्याची गोष्ट आपल्याला माहीत आहे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे कुरु-नन्दन! जे ह्या मार्गावर असतात त्यांची बुद्धी दृढ निश्चयात्मक अशी असते, आणि इतरांची मात्र असंख्य निरनिराळ्या ठिकाणी भिरभिरणारी अशी बुद्धी असते.

---

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः।

वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः।।2.42।।

हे पार्थ ! वेद-वाद-रताः, अन्यत् न अस्ति इति वादिनः, अविपश्चितः, याम् इमाम् पुष्पिताम् वाचम् प्रवदन्ति।

कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम्।

क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति।।2.43।।

काम-आत्मानः, स्वर्ग-पराः, भोग-ऐश्वर्य-गतिम् प्रति क्रिया-विशेष-बहुलाम् जन्म-कर्म-फल-प्रदाम्।

हे पार्थ ! याम् इमाम् पुष्पिताम् वाचम् जन्म-कर्म-फल-प्रदाम् भोग-ऐश्वर्य-गतिम् प्रति क्रिया-विशेष-बहुलाम् काम-आत्मानः, स्वर्ग-पराः, अन्यत् न अस्ति इति वादिनः, अविपश्चितः वेद-वाद-रताः, प्रवदन्ति ।

हे पार्थ !

वेद-वाद-रताः, वेदांच्या बाह्य शब्दार्थाला मोहित झालेले वेद-वाद-रत पु. प्र. ब. व.

अन्यत् इतर अन्य नपु. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति असते अस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

इति अव्यय

वादिनः, जे म्हणतात वादिन् पु. प्र. ब. व.

अविपश्चितः, अविवेकी अ+विपश्चित् पु. प्र. ब. व.

चित् धातू चिंतन करणे

विपश पश् धातू बांधणे

याम् जी यद् स्त्री. द्वि. ए. व.

इमाम् ही इदम् स्त्री. द्वि. ए. व.

पुष्पिताम् रमणीय (दिखाऊ) पुष्पिता स्त्री. द्वि. ए. व.

पुष्प् धातू विकसित होणे.

वाचम् वाणी वाचा स्त्री. द्वि. ए. व.

प्रवदन्ति म्हणतात प्र वद् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

काम-आत्मानः, काम-आत्मान् पु. प्र. ब. व.

स्वर्ग-पराः, स्वर्ग पर पु. प्र. ब. व.

भोग-ऐश्वर्य-गतिम् भोग-ऐश्वर्य-गति स्त्री. द्वि. ए. व.

प्रति अव्यय

क्रिया-विशेष-बहुलाम् क्रिया-विशेष-बहुला स्त्री. द्वि. ए. व. जन्म-कर्म-फल-प्रदाम्

जन्म-कर्म-फल-प्रदा स्त्री. द्वि. ए. व.

प्र+दा धातू देणे

ह्या पुढील 3 श्लोक हे काहिसे रूढीपरंपरांच्या विरोधी असे वाटतात. सध्याच्या काळात संस्कृत चा उपयोग मुख्यत्वे कर्मकांड करण्यासाठीच केला जातो. पण श्रीमद्भगवद्गीता ज्या काळात लिहिली गेली त्या काळाचा विचार केला असता, वेदांचे स्तोम माजवले जात होते का, वेदांत सांगितलेल्या कर्मकांडांना अनाठायी महत्त्व प्राप्त झाले होते का? असे विचारावे असे वाटते. तसेच अपौरुषेय वेद माणसांसाठी उपलब्ध तर आहेत पण ते समजून घेण्याची कुवत सुद्धा असायला हवी, नाहीतर प्रत्येकजण आपापल्या सोयीनुसार अर्थ काढणारच.

जसे वेदांमधील कर्मकांड विभागात सांगितल्याप्रमाणे

अपाम सोममृता अभूम आणि अक्षय्यं हे वै चातुर्मास्ययाजिन: सुकृतं भवति।।

जे चातुर्मासाचे पालन करतात ते अमर आणि सदैव आनंदी होण्यासाठी सोमपरसपान करण्यास पात्र ठरतात.

अशा परिस्थितीत कोणीतरी त्याला धरबंध घालणे आवश्यक असते, ते काम महर्षी व्यासांनी केले आहे असे वाटते.

अविद्यायामन्तरे वर्तमानाः स्वयंधीराः पण्डितं मन्यमानाः। जङ्घन्यमानाः परियन्ति मूढा अन्धेनैव नीयमाना यथान्धाः।।

मुण्डकोपनिषद्-1.2.8

"जे स्वर्गलोकाचे सुख मिळवण्याच्या हेतूने वेदांत वर्णन केलेल्या अवडम्बरपूर्ण कर्मकाण्डांत व्यस्त राहतात आणि स्वतःला धार्मिक ग्रंथपंडित समजतात ते वास्तविक मूर्ख आहेत, ते सर्व एका अंध व्यक्तिने दूसर्या अंध व्यक्ति ला रस्ता दाखविण्यासारखे आहे".

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! हे असे चांगला जन्म आणि कर्म मिळवून देणारे, भोग आणि ऐश्वर्यप्राप्तीची निरनिराळी वर्णन करणारे अतिशयोक्तीपूर्ण वचने निरनिराळ्या आशाआकांक्षा आणि स्वर्गसुखाच्या प्राप्ती शिवाय इतर काहीच श्रेष्ठ नाही अशी वेदांतील वचने खरे मानणारे, अविवेकी असतात.

---

भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।

व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते।।2.44।।

तया (पुष्पित-वाचा) अपहृत-चेतसाम् भोग-ऐश्वर्य-प्रसक्तानाम् व्यवसाय-आत्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते।

तया त्या वाणी द्वारा

तद् स्त्री तृ ए. व. अपहृत-चेतसाम् भ्रमित झालेली बुद्धी

अपहृत-चेतस् पु. ष. ब. व.

अप+हृ धातू चोरी करणे भोग-ऐश्वर्य-प्रसक्तानाम् भोग आणि ऐश्वर्य च्या आधीन भोग-ऐश्वर्य-प्रसक्त पु. ष. ब. व.

प्र+सञ्ज् धातू जवळीक असणे

व्यवसाय-आत्मिका दृढ निश्चय

व्यवसाय-आत्मिका स्त्री. प्र. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री प्र. ए. व.

समाधौ समाधि पु. स. ए. व.

न विधीयते घडत नाही वि+धी धातू धारण करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

41 व्या श्लोकात कर्मयोगाच्या मार्गावर चालणाऱ्या लोकांची निश्चयात्मक बुद्धि असते असे म्हटले होते. ह्या श्लोकात समाधी हा शब्द वापरला आहे. बौद्ध धर्मात, समाधी हे आठ पायऱ्यांपैकी शेवटचे आहे जे आत्मज्ञानाकडे नेले जाते ( अष्टपथ मार्ग ).अष्टांग योगातील महत्त्वाचे अंग.

सम् + आ + धा धातू धारण करणे. सम म्हणजे समानता, धी म्हणजे बुद्धी. तुम्ही जर बुद्धीच्या समभाव अवस्थेत पोहोचलात तर त्याला समाधी म्हणून ओळखले जाते. शुद्ध, वृत्तीरहित चित्त. म्हणजे समाधी.

आधीच्या दोन श्लोकात वेदांत सांगितलेल्या कर्मकांडांची भूल पडल्याने बुद्धी भ्रम होतो असे म्हटले आहे. ह्या श्लोकात समाधी अवस्था प्राप्त होत नाही असे म्हटले आहे. आणि हे कर्मयोगी साठी सांगितले आहे. म्हणजेच निश्चयात्मक बुद्धिने कर्म करणारे सुद्धा समाधीवस्थेत पोहोचू शकतात असा निष्कर्ष काढता येईल. ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की अशा (भ्रमित वचनांमुळे) बुद्धिभेद करणाऱ्या उपभोगशील आणि भौतिक सुखाच्या आधीन झालेल्या व्यक्तींकडे दृढ निश्चय आणि स्थिर बुद्धी असत नाही.

---

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।

निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान्।।2.45।।

हे अर्जुन ! वेदाः त्रैगुण्य-विषयाः। निस्त्रैगुण्यः, निर्द्वन्द्वः, नित्य-सत्त्वस्थः, निर्योगक्षेमः आत्मवान् भव

हे अर्जुन !

वेदाः वेद पु. प्र. ब. व. त्रैगुण्य-विषयाः त्रिगुण विषयक

त्रैगुण्य-विषय पु. प्र. ब. व.

निस्त्रैगुण्यः, त्रिगुण रहीत निस् त्रैगुण्य पु. प्र. ए. व.

निर्द्वन्द्वः,द्वंद्व रहीत निर द्वंद्व पु. प्र. ए. व.

नित्य-सत्त्वस्थः, सदैव स्थित नित्य-सत्त्वस्थ पु. प्र. ए. व.

निर्योगक्षेमः लाभ आणि रक्षण यापासून मुक्त निर+योग +क्षेम पु. प्र. ए. व.

क्षि धातू निवास करणे

युज धातू जोडणे

आत्मवान् आत्मपरायण आत्मवत् पु. प्र. ए. व.

भव हो भू धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

वेदांमध्ये त्रिगुणांची महती (आधीच्या श्लोकात कर्मकांड) सांगितली आहे असा समज हा श्लोक वाचून होऊ शकतो पण ते तसे नसून उपनिषदात सर्व तत्वज्ञानाची मांडणी केली आहे. प्रकृती मध्ये माया शक्ती च्या प्रभावातून निर्माण होणाऱ्या त्रिगुणांचे विस्तृत वर्णन आगामी अध्यायात वाचायला मिळेलच. भारतीय तत्वज्ञानाचा मूळ गाभाच मुळी आपल्याला त्रिगुणांच्या पलिकडे जाण्याचा मार्ग दाखवत असतो. आपल्याला गुणातीत व्हायचे आहे, त्याचे सूतोवाच ह्या श्लोकात केले आहे. निर्द्वन्द्व, निर्योगक्षेम, सत्वस्थ ह्या शब्दांचे अर्थ आपण समजून घ्यायला हवे.

आपल्या मनात निरनिराळ्या विरोधी भावनांचा खेळ चालू असतो जसे राग-लोभ, आनंद-दुःख वगैरे. हे सर्व त्रिगुणांच्या प्रभावातूनच निर्माण होते.

आपल्याजवळ नसलेल्या गोष्टीची प्राप्ती करून घेणे म्हणजे योग आणि प्राप्त करून घेतलेली ती गोष्ट सांभाळणे, तिचे जतन करणे म्हणजे क्षेम असा हा भेद आहे. योगापेक्षा क्षेम अवघड आहे असे वाटते. कारण “कठीण योगाहुनी क्षेम। ओकलिया होतो श्रम।।” हे तुकोबांचे वचन आहे.

मनामधे कोणतेही द्वंद्व नसलेला, सर्व विवंचना पासून मुक्त, सात्विक गुणांनी युक्त असा सत्वस्थ.

एखाद्या शब्दाला वान हा प्रत्यय लावला की तो परीपूर्णता दर्शवतो. जसे दयावान, बलवान. आत्मवान म्हणजे स्वतः मध्ये असलेला.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे अर्जुन! वेदांमध्ये त्रिगुणविषयक सांगितले आहे तू मात्र गुणातीत, द्वंद्व रहीत, स्वतःमध्येच स्थित, योगक्षेम रहीत आत्मपरायण असा हो.

---

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके। तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः।।2.46।।

सर्वतः सम्प्लुतोदके उदपाने यावान् अर्थः । विजानतः ब्राह्मणस्य सर्वेषु वेदेषु तावान् ।

सर्वतः सर्वत्र अव्यय

सम्प्लुतोदके परीपूर्ण जलाशय

सम्प्लुत-उदक पु. स. ए. व.

सम+प्लु धातू जाणे क्त प्रत्यय

उन्द् धातू आर्द्र होणे

उदपाने उदन् पान छोटा जलाशय पु. स. ए. व.

यावान् जेवढे यावत पु. प्र. ए. व.

अर्थः प्रयोजन अर्थ पु. प्र. ए. व.

विजानतः ज्ञानी वि+ज्ञा धातू शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

ब्राह्मणस्य ब्रह्मज्ञानाचे ब्राह्मण पु. ष. ए. व.

सर्वेषु सर्व पु. स. ब. व.

वेदेषु वेदांचे वेद पु. स. ब. व.

तावान् तेवढे तावत् पु. प्र. ए. व.

हा श्लोक वाचल्यावर डबक्यातल्या बेडकाच्या गोष्टीची आठवण येते. ज्याची नजर क्षितिजापर्यंत पोहोचली आहे त्याची छोट्या डबक्यातल्या बेडकाशी तुलना कशी करायची?

सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो

मत्तः स्मृतिर्जनमपोहनं च।

वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो

वेदांतकृद्वेदविदेव चाहम्।।15.15।।

सर्व प्राण्यांच्या हृदयात मी वसलेला आहे. माझ्या मुळेच स्मृती, ज्ञान आणि अपोहन शक्य आहे. वेदांच्या माध्यमातून मला जाणून घेता येईल. वेदांतील तत्व मीच साकारलेली आहेत आणि मीच वेदवित् आहे.

पण ज्याला ब्रह्म तत्त्व समजले आहे त्याला वेद अध्ययनाची काय गरज? निश्चयी बुद्धीने कर्मफलत्यागी होऊन कर्म करत राहणे हे कर्मयोगीचे कर्तव्य. कर्मयोगा बद्दल सांगताना महर्षी व्यासांनी हा श्लोक लिहिला आहे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

सर्वत्र परीपूर्ण जलाशय उपलब्ध असताना जेवढे छोट्या जलाशयाचे महत्त्व आहे तेवढेच आत्मज्ञानी व्यक्तीला वेदांचे प्रयोजन आहे.

---

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।

मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि।।2.47।।

कर्मणि एव; ते अधिकारः मा कदाचन फलेषु । कर्म-फल-हेतुः मा भूः मा ते अकर्मणि सङ्गः अस्तु।

कर्मणि नियत कर्मे कर्मन् नपु. स. ए. व.

एव; सुद्धा अव्यय

ते तुझे युष्मद् ष. ए. व.

अधिकारः अधिकार पु. प्र. ए. व.

मा नाही अव्यय

कदाचन कधीही अव्यय

फलेषु कर्मफलांवर फल नपु. स. ब. व.

कर्म-फल-हेतुः कर्म फलांचा हेतू

कर्म-फल-हेतु पु. प्र. ए. व.

मा नाही अव्यय

भूः होऊ कर्तरि लुङः लकार म. पु. ए. व.

मा नाही

ते तुझे युष्मद् ष. ए. व.

अकर्मणि कर्म न करणे अ+कर्मन् नपु. स. ए. व.

सङ्गः आसक्ती सङ्ग पु. प्र. ए. व.

अस्तु हो अस् धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

सर्वांनाच माहीत असणारा श्लोक. कर्मयोगाचे सार सांगणारा. कर्मफलाची इच्छा मनास शिवली म्हणजे आसक्ती निर्माण झाली. कर्मफलसंन्यास तर करायचाच आहे पण त्याच बरोबर कर्म करणे सोडायचे नाही. कर्म करणे हे आपल्या आयुष्याचे अविभाज्य अंग आहे.

यत्कृतं यत्करिष्यामि तत्सर्वं न मया कृतम् ।

त्वया कृतं तु फलभुक्त्वमेव परमेश्वर ॥ दीनाक्रन्दाख्य शिवक्षमापणम् 28॥

"जे काही मी प्राप्त केले आहे आणि जे मिळवायचे आहे त्याचा कर्ता मी नाही. परमेश्वरा! आपण तर सर्व घडवून आणता आणि कर्मफळांचा सुद्धा आपणच भोग घेता. "

तावत् कर्माणि कुर्वीत न निर्विद्येत यावता ।श्रीमद्भागवतम् 11.20.9।।

जोपर्यंत वैराग्य उत्पन्न झाले नाही तोवर कर्म केले पाहिजे.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

कर्म करणे हा तुझा अधिकारच आहे मात्र त्याच्या श्रेयावर नाही. कर्मफळाच्या इच्छेने कर्म करण्यासाठी प्रवृत्त होऊ नकोस. (कर्मफळ मिळवायचेच नाही तर) आणि कर्म करण्याची अनिच्छा पण ठेवू नकोस.

---

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनञ्जय।

सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते।।2.48।।

हे धनञ्जय! सङ्गम् त्यक्त्वा, सिद्धि-असिद्ध्योः समः भूत्वा, योगस्थः कर्माणि कुरु। समत्वम् योगः उच्यते।

हे धनञ्जय!

सङ्गम् आसक्ती सङ्ग पु. द्वि. ए. व.

त्यक्त्वा त्यागून त्यज् धातू क्त्वा प्रत्यय

सिद्धि-असिद्ध्योः यश अपयशात

सिद्धि-असिद्धि स्त्री. स. द्वि. व.

समः समान सम पु. प्र.व.

भूत्वा, होऊन भू धातू क्त्वा प्रत्यय

योगस्थः योगामध्ये स्थिर योग स्थ पु. प्र. ए. व.

कर्माणि कर्मे कर्मन् नपु. द्वि. ब. व.

कुरु कर कृ धातू कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

समत्वम् समभाव समत्व नपु. प्र. ए. व.

योगः योग पु. प्र. ए. व.

उच्यते म्हटले जाते वच् धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

कर्मयोगाची ठळक वैशिष्ट्ये आपण समजून घेतली. जसे कर्म तर करायचे पण त्याच्या श्रेयाची अपेक्षा करायची नाही. कर्मफळाचा उपभोग घेणारा भोक्ता होण्याचा विचार सुद्धा करायचा नाही. इतकेच नव्हे तर कर्माचा कर्ता असण्याचा अहंकार सुद्धा बाळगायचा नाही. आणि हे सर्व करताना कर्म त्यागण्याचा विचार मनात आणायचा नाही. हे झाले चांगल्या कर्मांच्या संबंधी.

काही कर्मे करणे आवश्यक तर असते पण इतरांच्या दृष्टीने त्याला कमी दर्जाचे समजले जाते. मग अशी कर्मे करताना मनात चलबिचल तर होणारच. अशा मानसिक स्थितीवर तोडगा सुचवणारा हा श्लोक.

44 व्या श्लोकात दृढ निश्चय आणि स्थिर बुद्धी मुळे समाधीवस्था प्राप्त होते असे म्हटले आहे. ह्या श्लोकात समता तत्वावर भाष्य केले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे धनञ्जय! अनुरक्त वृत्तीचा (आसक्ती) त्याग करून, यश आणि अपयश ह्या दोन्ही परीस्थितीत समतोल ठेवून तू तुझे कार्य कर. ह्यालाच समत्व योग असे म्हणतात.

---

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनञ्जय। बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः।।2.49।।

हे धनञ्जय! बुद्धि-योगात् कर्म दूरेण अवरम् बुद्धौ शरणम् अन्विच्छ हि। फल-हेतवः कृपणाः।

हे धनञ्जय!

बुद्धि-योगात् बुद्धि-योगपेक्षा बुद्धि-योग पु. पं. ए. व.

कर्म सकामकर्म कर्मन् नपु. प्र. ए. व.

दूरेण लांब ठेवण्याजोगे अव्यय

दूर+एण प्रत्यय

अवरम् घृणास्पद अवर नपु. प्र. ए. व.

अव खाली

बुद्धौ बुद्धि स्त्री. स. ए. व.

शरणम् शरण नपु. द्वि. ए. व.

अन्विच्छ (तू) शोध अनु+इष् धातू इच्छा करणे कर्तरि लोट लकार म. पु. ए. व.

हि।

फल-हेतवः फलहेतु पु. प्र. ब. व.

कृपणाः दीन कृपण पु. प्र. ब. व.

कृप धातू दुर्बल असणे

निश्चयात्मक बुद्धि हा शब्द आपण आधीच्या श्लोकात वाचला, त्यालाच ह्या श्लोकात बुद्धीयोग असे म्हटले आहे.

कृपण शब्दाचे अनेक अर्थ वाचायला मिळतात.

कृपणो योऽजितेन्द्रियः"।। श्रीमदभागवत। 11.19.44।। " ज्याचे इन्द्रियांवर नियंत्रण नाही तो कृपण".

न वेद कृपणः श्रेय आत्मनो गुणवस्तुदृक् । तस्य तानिच्छतो यच्छेद् यदि सोऽपि तथाविधः।।

श्रीमद्भागवतम्-6.9.49।।

ज्यांना भौतिक शक्ति तून निर्माण होणारे इन्द्रिय विषयक सुख म्हणजेच परम सत्य वाटते ते कृपण आहेत.

आधीच्या श्लोकात अर्जुनाला आसक्ती चा त्याग कर असे सांगितले आहे तोच धागा पकडून ह्या श्लोकाचा अर्थ लावायला हवा. समभाव संपला की भावभावनांचा खेळ सुरू होतो. बुद्धियोग आणि फलाची अपेक्षा ठेवून केलेले कर्म, दोन्ही एकत्र येऊ शकत नाही, त्यांच्या मध्ये कायम अंतर राहणारच.

म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण अर्जुनाला असे म्हणतात की

हे धनञ्जय बुद्धियोगाच्या तुलनेत सकाम कर्म अगदीच नित्कृष्ट आहे. तू समता भावाचा आश्रय घे, फलाची अपेक्षा ठेवणे केविलवाणे आहे.

---

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते। तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्।।2.50।।

बुद्धि-युक्तः सुकृत-दुष्कृते उभे इह जहाति। तस्मात् योगाय युज्यस्व। योगः कर्मसु कौशलम्।

बुद्धि-युक्तः समबुद्धि ने युक्त असा

बुद्धि-युक्त पु. प्र. ए. व.

सुकृत-दुष्कृते चांगली आणि वाईट कर्मे

सुकृत-दुष्कृत नपु. द्वि. द्वि . व.

उभे दोघे उभ नपु. द्वि. द्वि . व.

इह ह्या जगात अव्यय

जहाति त्यागतो हा धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

योगाय योगाला योग पु. च. ए. व.

युज्यस्व जोडलेला रहा (अंगिकार कर)

युज् धातू कर्तरि लोट लकार आत्मनेपदी म. पु. ए. व.

योगः योग पु. प्र. ए. व.

कर्मसु कर्मातील कर्मन् नपु. स. ब. व.

कौशलम् नैपुण्य कौशल नपु. प्र. ए. व.

अर्जुनाला युद्ध करायचे आहे, त्यासाठी त्याची मानसिक तयारी ह्या श्लोकाच्या निमित्ताने होत आहे. बुद्धियोग ह्या शब्दाचा अर्थ आपण समजून घेतला आहे. आपल्याला समते बद्दल 3र्या 4थ्या 5व्या 12 व्या आणि 18 व्या अध्यायात जास्त जाणून घ्यायचे आहे. समतेचे महत्त्व इतक्या चांगल्या पद्धतीने मांडले आहे जे मला आजच्या राजकीय परिस्थितीत समर्पक वाटते. सर्वांच्या प्रती समता म्हणजे डाव्या आणि उजव्या बाजूला झुकण्याची काहीच गरज नाही.

न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते। त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः।।18.10।।

जो पुरुष अशुभ कर्मांचा द्वेष (वाईट भावना सुद्धा नाही) करत नाही आणि शुभ कर्मांची त्याला आसक्ती नसते, असा सद्गुणी संपन्न पुरूष निःसंशय बुद्धीमान आणि त्यागी आहे. ह्या श्लोकात कुशल आणि अकुशल कर्मांचा उल्लेख आहे. सर्व कर्मांप्रती समता भाव राखणे म्हणजेच कर्म कौशलम्.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

बुद्धि युक्त व्यक्ति ह्या जगातच चांगल्या आणि वाईट कर्मांचा त्याग करतो. तू सुद्धा समत्व भावनेचा अंगिकार कर. कारण असे कौशल्याने कर्म करणे हाच योग आहे.

---

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः।

जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम्।।2.51।।

हि बुद्धि-युक्ताः मनीषिणः कर्मजम् फलं त्यक्त्वा जन्म-बन्ध-विनिर्मुक्ताः अनामयम् पदम् गच्छन्ति।

हि कारण अव्यय

बुद्धि-युक्ताः समता भाव युक्त

बुद्धि-युक्त पु. प्र. ब. व.

मनीषिणः ज्ञानी मनीषिन् पु. प्र. ब. व.

ईश् धातू अधिकार असणे

मन् धातू जाणणे

कर्मजम् कर्मातून उत्पन्न झालेले

कर्मज नपु. द्वि. ए. व.

फलं फल नपु. द्वि. ए. व.

त्यक्त्वा त्यागून त्यज् धातू क्त्वा प्रत्यय जन्म-बन्ध-विनिर्मुक्ताः जन्म मृत्यू च्या बंधनातून मुक्त झालेले

जन्म-बन्ध-विनिर्मुक्त पु. प्र. ब. व.

मुच् धातू मुक्त होणे क्त प्रत्यय

अनामयम् निर्विकार अनामय नपु. द्वि. ए. व.

अन् +आमयम्

अम् धातू आजारी असणे

मी धातू मारणे, दुःख देणे

पदम् पद नपु. द्वि. ए. व.

गच्छन्ति जातात गम् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

आधीच्या श्लोकात कर्म कौशलम् असा शब्द वापरून समता भाव राखणे ही एक जगण्याची कला आहे असे महर्षी व्यास अर्जुनाला सांगण्याचा प्रयत्न करत आहेत त्यासाठी ते मनीषिण म्हणजे ज्ञानी व्यक्तींचे उदाहरण देत आहेत. अर्जुन आणि श्रीभगवानकृष्णांचे अनेक प्रकारचे नाते आहे पण अजून अर्जुनाने श्रीभगवानकृष्णांचे परमेश्वरी रूप ओळखलेले नाही. हळूहळू अर्जुनाला ती जाणीव होणार आहे ती ह्या अशा श्लोकांतून.

सुखाय कर्माणि करोति लोको न तैः सुखं वान्यदुपारमं वा।

विन्देत भूयस्तत एव दुःखं यदत्र युक्तं भगवान् वदेनः।।

श्रीमद्भागवतम्-3.5.2

सर्व लोक सुख प्राप्तीच्या अपेक्षेने कर्म करत राहतात पण त्यांना संतुष्टि मिळत नाही. तर उलट फलाची आशा ठेवून कर्म केल्याने त्यांना आणखी कष्ट होत असतात. जे स्थितप्रज्ञ राहून आपले कर्म करतात त्यांच्या मनात राग लोभ आसक्ती द्वेष असे कोणतेच दोष नसल्याने ते निर्विकार म्हणजे अनामय म्हणजे निरोगी असतात. 14 व्या अध्यायातील 6 व्या श्लोकात हाच शब्दप्रयोग सात्त्विक गुणांचे वर्णन करताना वापरला आहे. मनात कोणतेही विकार शिल्लक नसल्याने त्यांच्या जन्ममरणाचे काही कारणच उरत नाही तशा अर्थाने ते जन्म मृत्यू च्या बंधनातून मुक्त होतात.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

बुद्धि युक्त योग चा पुरस्कार करणारे ज्ञानी, कर्मातून निर्माण होणाऱ्या फलांचा त्याग करून जन्म बंधनातून मुक्त होऊन विकार रहीत पद प्राप्त करतात.

---

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति।

तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च।।2.52।।

यदा ते बुद्धिः मोह-कलिलम् व्यतितरिष्यति, तदा श्रुतस्य श्रोतव्यस्य च निर्वेदम् गन्तासि।

यदा जेव्हा अव्यय

ते तुझी युष्मद् ष. ए. व.

बुद्धिः बुद्धि बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

मोह-कलिलम् मोह रूपी दलदल

मोह-कलिल नपु. द्वि. ए. व.

मुह् धातू बुद्धी भ्रष्ट होणे

कल् धातू फेकणे कल्-इलच् व्यतितरिष्यति, पार करून जाईल

वि+अति+तॄ धातू तरंगणे कर्तरि लृट लकार प्र. पु. ए. व.

तदा तेव्हा अव्यय

श्रुतस्य ऐकलेल्या श्रु धातू ऐकणे क्त प्रत्यय नपु ष. ए. व.

श्रोतव्यस्य ऐकीवात येणाऱ्या श्रु धातू तव्यत् नपु. ष. ए. व.

च सुद्धा अव्यय

निर्वेदम् वैराग्य निर्वेद पु. द्वि. ए. व.

निर+विद् धातू प्राप्त होणे

गन्तासि प्राप्त होईल

गम् धातू जाणे कर्तरि लुट लकार म. पु. ए. व.

ह्या अध्यायातील सुरवातीच्या श्लोकात आत्म्याची वैशिष्ट्ये सांगून तारतम्य बाळगून मृत्यूसंबंधी विचार करण्यास सांगितले होते. धार्मिक कर्मकांडांवर महर्षी व्यासांनी त्यांची भूमिका ह्या अध्यायातील 43-45 व्या श्लोकात स्पष्टपणे मांडली आहे.

अर्जुनाला समत्व भावनेचा अंगिकार करायला सांगून कर्मयोग समजावून सांगितला. आता ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जेव्हा तुझी बुद्धी मोहरूपी दलदलीतून तरून बाहेर पडेल, तेव्हा आतापर्यंत ऐकलेले (अनुभवलेले) आणि ऐकू येणाऱ्या (चर्चिले जाणारे) भोगांपासून वैराग्य पद प्राप्त होईल.

---

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला।

समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि।।2.53।।

श्रुति-विप्रतिपन्ना ते बुद्धिः यदा समाधौ निश्चला अचला स्थास्यति, तदा योगम् अवाप्स्यसि।

श्रुति-विप्रतिपन्ना श्रुतींमुळे निर्माण झालेली संभ्रमावस्था श्रुति-विप्रतिपन्ना स्त्री. प्र. ए. व.

वि+प्रति+पद् धातू जाणे क्त प्रत्यय (विपरीत जाणे)

ते तुझे युष्मद् ष. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री प्र. ए. व.

यदा जेव्हा अव्यय

समाधौ समाधि पु. स. ए. व.

निश्चला स्थिर निश्चला स्त्री. प्र. ए. व.

अचला स्थिर अचला स्त्री प्र. ए. व.

स्थास्यति, स्थिर होईल

स्था कर्तरि लृट लकार प्र. पु. ए. व.

तदा तेव्हा अव्यय

योगम् योग पु. द्वि. ए. व.

अवाप्स्यसि प्राप्त होईल अव+आप धातू कर्तरि लृट लकार म. पु. ए. व.

ह्या श्लोकात श्रुति असा शब्द वापरला आहे ज्याचा अर्थ वेद असा घेता येईल. कारण आधीच्या श्लोकांत वेदातील कर्मकांडांवर भाष्य केलेले आहे. 42 व्या श्लोकात पुष्पित-वाचा असा शब्द वापरला होता.

त्याच श्लोकाचा आधार घेऊन हा श्लोक समजून घेता येईल.

मन विचलित झालेले असेल तर कोणतेच काम नीट करता येणार नाही. अर्जुनाला आपले मन शांत, अविचल ठेवणे फारच गरजेचे आहे. आपल्यासाठी सुद्धा हा एक चांगला उपदेश आहे. अटीतटीच्या प्रसंगी आपले मन स्थिर असले पाहिजे. समत्व भावा बद्दल आपण आतापर्यंत मागच्या काही श्लोकात वाचले. येथे समाधौ अचला असे म्हटले आहे म्हणजे समत्व भावाने स्थिर असलेली बुद्धी. बुद्धिची स्थिरावस्था.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

निरनिराळ्या गोष्टी ऐकून विचलित झालेल्या तुझ्या बुद्धीला जेव्हा अचल स्थिरावस्था येईल तेंव्हा तुला योग (अवस्था) प्राप्त होईल.

---

अर्जुन उवाच

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।

स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्।।2.54।।

अर्जुन उवाच - हे केशव! समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य का भाषा? स्थितधीः किम् प्रभाषेत? किम् आसीत? किम् व्रजेत?

अर्जुन उवाच -

हे केशव!

समाधिस्थस्य समाधिस्थ पु. ष. ए. व.

स्थितप्रज्ञस्य स्थितप्रज्ञ पु. ष. ए. व.

का किम् स्त्री. प्र. ए. व.

भाषा स्त्री. प्र. ए. व.

स्थितधीः स्थिर बुद्धी असणारा

स्थित धी पु. प्र. ए. व.

किम् कसा किम् नपु. द्वि. ए. व.

प्रभाषेत बोलतो प्र+भाष् धातू भाष्य करणे कर्तरि विधीलिङः लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

किम् कसा किम् नपु. द्वि. ए. व.

आसीत बसतो आस् धातू बसणे कर्तरि विधीलिङः लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

किम् कसा किम् नपु. द्वि. ए. व.

व्रजेत चालतो व्रज् धातू जाणे कर्तरि विधीलिङः लकार म. पु. ब. व.

ह्या श्लोकात अर्जुनाने श्रीभगवानकृष्णांना तत्वज्ञानासंबंधी पहिला प्रश्न विचारला आहे. ह्या निमित्ताने आपल्याला काही महत्वाच्या विषयांची माहिती मिळणार आहे. समाधीवस्था म्हणजे 'मीच ब्रह्म आहे' असा साक्षात्कार झालेली व्यक्ती. ती व्यक्ती समाधीवस्थेतून बाहेर जरी आली असली तरी समाधी चा प्रभाव त्या व्यक्तीच्या चालण्याबोलण्यात दिसून येणारच. ज्ञानी मनुष्य हा त्याच्या बोलण्यावरून ओळखता येतो. इथे तर ब्रह्म ज्ञान झाले आहे म्हणजे ती व्यक्ती सामान्य लोकांपेक्षा वेगळे वर्तन करत असणार. सिद्ध पुरूष कसा ओळखायचा ह्याचे विवेचन पुढील श्लोकात वाचायला मिळेल असे वाटते.

ह्या श्लोकात अर्जुन श्रीभगवानकृष्णांना असे विचारत आहे की

हे केशव! समाधी अवस्था प्राप्त झालेला स्थिरबुद्धि असलेल्या पुरूषाचे काय लक्षण आहे? स्थिर बुद्धी असलेला पुरूष बोलतो कसा? बसतो कसा? चालतो कसा?

---

श्री भगवानुवाच

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्।आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते।।2.55।।

श्रीभगवानुवाच - हे पार्थ! यदा मनोगतान् सर्वान् कामान् प्रजहाति, आत्मना आत्मनि एव तुष्टः तदा स्थितप्रज्ञः उच्यते।

श्रीभगवानुवाच -

हे पार्थ!

यदा जेव्हा अव्यय

मनोगतान् मनातल्या मनः गत पु. द्वि. ब. व.

सर्वान् सर्व पु. द्वि. ब. व.

कामान् कामना काम पु. द्वि. ब. व.

प्रजहाति, पूर्णत्याग प्र+हा धातू त्यागणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

आत्मना आत्म्याने आत्मन् पु. तृ. ए. व.

आत्मनि आत्म्यामधे आत्मन् पु. स. ए. व.

एव च अव्यय

तुष्टः तृप्त तुष् धातू संतुष्ट होणे क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

तदा तेव्हा अव्यय

स्थितप्रज्ञः स्थितप्रज्ञ पु. प्र. ए. व.

उच्यते वच् धातू बोलणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आधीच्या श्लोकात आपण कर्मयोग आणि ज्ञानयोग ह्याबद्दल वाचले आहे. पुढील अध्यायात आपण भक्तीयोग बद्द्ल वाचणार आहोत. तिन्ही योगात मनाची स्थितप्रज्ञ स्थिती असणारच आहे. ती स्थिती ओळखायची कशी? त्याची लक्षणे काय आहेत? ते ह्या श्लोकात सांगितले आहे.

हा श्लोक वाचल्यावर तुकारामांच्या अभंगाची आठवण होते, "ठेविले अनंते तैसेचि रहावे | चित्ती असू द्यावे समाधान ||'

ह्या श्लोकात मनोगतान् कामान् असे म्हटले आहे. म्हणजे मनामध्ये निर्माण होणाऱ्या निरनिराळ्या आशाआकांक्षा आणि त्यातून निर्माण होणाऱ्या विवंचना मतभेद संघर्ष नैराश्य तसेच आनंदी भावना सुद्धा.

यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः। अथ मोऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ।।कठोपनिषद्-2.3.14

"जेव्हा मनुष्याच्या हृदयातील प्रत्येक कामना संपून जातात तेव्हा तो मर्त्य अमर होतो आणि ब्रह्मप्राप्ती चे सुख अनुभवतो."

मनात उत्पन्न होणाऱ्या सर्व कामनांचा पूर्ण त्याग करायचा हे स्थितप्रज्ञ व्यक्तीचे लक्षण.

असे करत असता ब्रह्म आणि आत्मा यांचे ऐक्य घडल्यामुळे, उच्च कोटीचे समाधान त्याला लाभते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! जेव्हा मनुष्य आपल्या मनातील सर्व कामनांचा त्याग करतो, आणि स्वतः स्वतःमध्येच संतुष्ट राहतो त्या स्थितीला स्थितप्रज्ञ असे म्हटले जाते.

---

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः।वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते।।2.56।।

दुःखेषु अनुद्विग्न-मनाः, सुखेषु विगत-स्पृहः, वीत-राग-भय-क्रोधः मुनिः स्थितधीः उच्यते।

दुःखेषु दुःखात दुःख नपु. स. ब. व.

अनुद्विग्न-मनाः, मन उद्विग्न होऊ न देणारा

अन्+उद्विग्न +मनस् नपु. प्र. ए. व.

सुखेषु सुखामध्ये सुख नपु. स. ब. व.

विगत-स्पृहः, तृष्णा संपलेला विगत-स्पृह पु. प्र. ए. व.

स्पृह धातू इच्छा करणे वीत-राग-भय-क्रोधः राग भय क्रोध रहीत वीत-राग-भय-क्रोध पु. प्र. ए. व.

वि+ इ धातू जाणे क्त प्रत्यय

मुनिः मननशील मुनि पु. प्र. ए. व.

स्थितधीः स्थिर बुद्धी स्थित+धी पु. प्र. ए. व.

उच्यते म्हटले जाते वच् धातू कर्मणि लट लकार आत्मनेपदी प्र.पु.ए.व.

स्थितप्रज्ञतेचे दुसरे लक्षण ह्या श्लोकात सांगितले आहे. सामान्य व्यक्तीला हे वाचून फारसे पटणार नाही पण येथे ब्रह्मप्राप्ती च्या मार्गावर वाटचाल सुरू आहे आणि त्यातून स्थितप्रज्ञता आली आहे. आपल्या रोजच्या जीवनातही, मनाला फार क्लेश होऊ न देता आपले काम करत राहणे फायद्याचेच ठरते.

मुनि ह्या शब्दाचा संकलीत केलेला अर्थ असा, मौनम आचरति इति मुनि,

जो आपल्या तपश्चर्येदरम्यान मौन व्रत पाळतो. मन् धातू पासून तयार झालेला शब्द मनन, मनन म्हणजे विचार करणे. मुनी म्हणजे जो आत्मनिरीक्षण करतो किंवा विचारशील असतो. मौन म्हणजे मानसिक तप.
।श्रीमद्भगवद्गीता 17.16।।

धर्मशास्त्रातील उल्लेखांनुसार, मुनी म्हणजे सदैव स्वतःचा शोध घेणारी व्यक्ती. तसेच आपला बहुतांश वेळा विचार करण्यात घालवत असतो तो मुनी. मुनी ही विचारवंत आणि तत्त्वज्ञाला प्रदान करण्यात आलेली एक उपाधी आहे, असे सांगितले जाते. मुनी निसर्गाच्या संबंधातील उत्कट मानवी धाग्यांचा शोध घेत असतात. त्यांना ज्ञानाच्या कसोटीवर उच्च स्थान प्राप्त असते. त्यांनी अनंत काळ तपश्चर्या आणि साधनेच्या माध्यमातून ज्ञानार्जन केलेले असते.

प्रत्येक मुनींचा वैचारिक दृष्टीकोन निराळा असतो.

नासव ऋषिर यस्य मतं न भिन्नं (महाभारत, वन-पर्व 313.117)

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

दुःखे आली असता मनाला क्लेश होऊ न देणारा आणि आनंदाच्या भरात मनात कोणत्याही आस्था न बाळगणारा, ज्याच्या मनातून राग, भय आणि क्रोध नष्ट झाले आहेत अशा मुनीला स्थिरबुद्धि असे म्हटले जाते.

---

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम्। नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।।2.57।।

यः सर्वत्र अनभिस्नेहः, तत् तत् शुभ-अशुभम् प्राप्य, न अभिनन्दति, न द्वेष्टि, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

सर्वत्र अव्यय

अनभिस्नेहः, स्नेहरहीत

अन् +अभिस्नेह पु. प्र. ए. व.

स्निह् धातू प्रेम करणे

तत् तत् ते ते

तद् नपु. द्वि. ए. व.

शुभ-अशुभम् शुभ-अशुभ नपु. द्वि. ए. व.

प्राप्य, प्राप्त झाल्यावर प्र +आप् धातू प्राप्त होणे ल्यप प्रत्यय

न अव्यय

अभिनन्दति, प्रसन्न होतो अभि+नन्द् धातू आनंदी होणे कर्तरि लट लकार प्र. पु. व.

न अव्यय

द्वेष्टि द्वेष करतो

द्विष् धातू शत्रूत्व करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

तस्य त्याचे तद् पु. ष. ए. व.

प्रज्ञा बुद्धि प्रज्ञा स्त्री. प्र. ए. व.

प्रतिष्ठिता स्थिर प्र+स्था धातू क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

आतापर्यंत महर्षी व्यासांनी वैयक्तिक पातळीवर निर्माण होणाऱ्या भावभावनांचा उल्लेख करून त्याप्रती असणाऱ्या स्थिर बुद्धी बद्दल सांगितले आता आपल्या भवताली घडणाऱ्या अनेक बऱ्यावाईट गोष्टींबद्दल ते सांगत आहेत. ज्ञानी व्यक्तींची स्थितप्रज्ञता अशा प्रसंगी सुद्धा दिसून येते.

शुभ अशुभ हे फक्त प्रसंग आणि एखाद्या गोष्टीपुरते मर्यादित न राहता ते व्यक्तीला सुद्धा लागू करून सामुहिक हेटाळणी करेपर्यंत मजल जाते. हा श्लोक आपल्यासाठी अशा परीस्थितीत मार्गदर्शक ठरावा. कोणत्याही परिस्थितीत आपण आपल्या मनाचा तोल ढळू न देणे महत्त्वाचे. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो सर्वत्र आसक्ती रहीत भावाने, शुभ अशुभ प्रसंगी आनंदी होत नाही आणि द्वेषही करत नाही त्याची स्थिर बुद्धी आहे.

---

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः।

इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।।2.58।।

कूर्मः सर्वशः अङ्गानि इव, यदा च अयम् इन्द्रिय-अर्थेभ्यः इन्द्रियाणि संहरते, तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।

कूर्मः कासव कूर्म पु. प्र. ए. व.

सर्वशः सर्वबाजूंनी अव्यय

अङ्गानि अवयव अङ्ग नपु. द्वि. ए. व.

इव, जसे अव्यय

यदा जेव्हा अव्यय

च सुद्धा अव्यय

अयम् हा इदम् पु. प्र. ए. व.

इन्द्रिय-अर्थेभ्यः इन्द्रिय विषयक

इन्द्रिय-अर्थ नपु. पं. ब. व.

इन्द्रियाणि इन्द्रिये

इन्द्रिय नपु. द्‌वि. ब. व.

संहरते आवरून घेतात सम+हृ धातू हरण करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

तस्य त्याची तद् पु. ष. ए. व.

प्रज्ञा बुद्‌धि स्त्री प्र. ए. व.

प्रतिष्ठिता स्थिर प्र+स्था धातू क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

आपल्या इच्छा आणि कामनांची पूर्ती झाल्याने मनाला समाधान लाभते की त्यापासून दूर गेल्याने? ह्या मानसशास्त्रीय मुद्यावर ह्या श्लोकात भाष्य केले आहे असे वाटते.

न जातु कामः कामानामुपभोगेन शाम्यति ।

हविषा कृष्णवर्मेव भूय एवाभिवर्धते ।।

श्रीमद्‌भागवतम्-9.19.14

"जसे आगीत तुपाची आहुति दिल्याने आग शांत तर होत नाही उलट त्याची भीषणता वाढते. त्याच प्रमाणे कामनवासना उपभोगांनी शमत नाही.

स्थिर बुद्‌धी बद्‌दल सांगून झाल्यावर आता कासवाची उपमा देऊन हा श्लोक समजावून सांगितला आहे. कासव हा अतिशय मंदगती, म्हणजे स्थिरता, संयम आणि चिकाटी चे प्रतिक. स्थिरबुद्‌धिने आपल्या ध्येयाकडे वाटचाल करणारा.

आख्यायिकेनुसार कूर्म अवतार हा भगवान विष्णूंचा दुसरा अवतार. मंदिराच्या सुरवातीला दिसणारे कासव अध्यात्मिक उन्नतीचे प्रतिक आहे. जसे कासवाची 6 अंगे (4 पाय डोके आणि शेपूट), कासव आपल्या कवचाखाली ओढून घेतो तसेच काम, क्रोध, मद, मोह, मत्सर, लोभ ह्या दुर्गुणांना आत खेचून परमेश्वराला शरण जावे.

विविध वातावरणाशी आणि भौगोलिक प्रदेशाशी जुळवून घेणारे कासव, मंद हालचाली आणि कवचाच्या आवरणामुळे अपघात, जखम आणि संकटातून पार करण्याची क्षमता दर्शवतो.

अर्जुनाने 54 व्या श्लोकात विचारलेल्या प्रश्नाचे (समाधीस्थ पुरूष बसतो कसा? चालतो कसा? महर्षी व्यासांनी समर्पक उत्तर दिले आहे असे वाटते.

ह्या श्लोकाचा थोडक्यात अर्थ असा की

ज्याप्रमाणे कासव आपले अवयव सर्व बाजूंनी आकुंचित करतो तसेच आपल्या इच्छा आकांक्षांना आवर घालणाऱ्याची बुद्धि स्थिर असते.

---

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः।

रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते।।2.59।।

निराहारस्य देहिनः विषयाः रसवर्जम् विनिवर्तन्ते। अस्य रसः अपि परम् दृष्ट्वा निवर्तते।

निराहारस्य उपभोग न करणाऱ्या

निर्+आहार पु. ष. ए. व.

देहिनः देहधारी आत्मा देहिन् पु. ष. ए. व.

विषयाः उपभोगाचे विषय विषय पु. प्र. ब. व.

रसवर्जम् भोगांचा त्याग रसवर्ज पु. द्वि. ए. व.

रस धातू आस्वाद घेणे

विनिवर्तन्ते निवृत्त होतात वि+नि+वृत् धातू प्रवृत्त होणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ब. व.

अस्य या (पुरूषाची) इदम् पु. ष. ए. व.

रसः भोग-विलास रस पु. प्र. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

परम् श्रेष्ठत्व पर नपु. द्वि. ए. व.

दृष्ट्वा पाहून दृश् धातू क्त्वा प्रत्यय

निवर्तते निवृत्त होते

नि+वृत् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आजकालच्या वजन कमी करण्यासाठीच्या उपायात बरेचसे खाद्यपदार्थ वर्ज्य केले जातात. त्याने वजन कमी होते सुद्धा पण काही दिवसांनी वजन परत झपाट्याने वाढू लागते कारण आपली रसनिवृत्ती झालेली नसते. आपण आपल्या खाण्याची फक्त इच्छा दाबून टाकलेली असते. स्थिर बुद्धी व्यक्तींमध्ये नेमका हाच फरक दिसून येतो.

आयुर्वेदानुसार रसना म्हणजे जीभ. जीभ या इंद्रियाने ज्या अर्थाचे (विषयाचे) ज्ञान होते त्याला रस म्हणतात. रस ही संकल्पना फक्त पदार्थाची चव इतकीच मर्यादित नसून शरीरातील धातुघटक, औषधिकरणामध्ये पारद इत्यादी म्हणूनही वापरली गेली आहे. रस म्हणजे एक विशिष्ट प्रकारची चित्तवृत्ती होय. हिचे स्वरूप आस्वादाचे, चर्वणेचे व आल्हादानुभवाचे असते. रस म्हणजे जगण्याची उर्मी. जगणे अवघड वाटायला लागले की आयुष्यात रस रहात नाही. रस म्हणजे कुतुहल. काहींना अध्यात्मात रस असतो तर काहींना भटकंती मध्ये. ह्या श्लोकात रस ह्या शब्दाचा अर्थ परमेश्वराशी एकरूप होण्याची इच्छा असा सुद्धा घेता येईल.

रसो वै सः। रसं ह्येवायं लब्धवाऽऽनन्दी भवति।तैत्तिरीयोपनिषद्-2.7)

सत् चित् आनंद अशा परमेश्वराची प्राप्ती झाल्याने आत्मा आनंदमयी होतो.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

उपभोग घेणे सोडून देणारे, उपभोगांचे विषय सोडून देतात पण त्यांची विलासी वृत्ती संपत नाही. पण (स्थितप्रज्ञ माणसाची) परमेश्वराला प्राप्त करून विलासी वृत्ती संपुष्टात येते.

---

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः। इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः।।2.60।।

हे कौन्तेय! प्रमाथीनि इन्द्रियाणि यततः विपश्चितः पुरुषस्य अपि मनः प्रसभं हरन्ति हि।

हे कौन्तेय!

प्रमाथीनि खळबळजनक प्रमाथिन् नपु. प्र. ब. व.

मथ् धातू मनन करणे

इन्द्रियाणि इन्द्रिय नपु. प्र. ब. व.

यततः प्रयत्न करताना यत् धातू प्रयत्न करणे तासिल प्रत्यय

विपश्चितः विवेकी विपश्चित् पु. ष. ए. व.

वि + प्र + चित् धातू चिंतन करणे+ क्विप् प्रत्यय

पुरुषस्य व्यक्तीचे पुरूष पु. ष. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

मनः मन पु. प्र. ए. व.

प्रसभं बलपूर्वक प्रसभ नपु. द्वि. ए. व.

भा धातू चमकणे

हरन्ति हरण करतात

हृ धातू हरण करणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

हि नक्कीच अव्यय

आपल्याला होणार्या निरनिराळ्या जाणीवा जसे रंग आकार पोत गार गरम, आपली बुद्धी, स्मरणशक्ती, कल्पनाशक्ती, तर्कशक्ती आणि इच्छाशक्ती ह्या सर्वांना मन असे म्हणता येईल. मन नक्की कुठे आहे हे दाखवता येत नसले तरी विज्ञानाच्या दृष्टीने ते मेंदूत आहे.

संत ज्ञानेश्वर महाराज सांगतात...हे मन कैसे केवढे । ऐसे पाहो म्हणो मी तरी न सापडे ।।एरव्ही राहाटावया थोडे । त्रैलोक्य राया ।।

मेंदू ला जर एकाच विषयावर लक्ष केंद्रित करायचे असेल तर डोळे व कान बंद ठेवावे लागतील. तरीसुद्धा आपले मन सतत भरारी मारत राहते.

एका कवीने म्हटल्याप्रमाणे

बालक मन और वानरा,कबहुं न रे निचंत |

बाल और वानर सोत है,यह सोवत में भी उडन्त ||

झोपेत बालक आणि वानर शांत राहतील पण मन मात्र  उड्या मारतच राहते.

बहिणाबाई   म्हणतात,

मन मोकाट मोकाट त्याच्या ठायी ठायी वाटा, जशा वाऱ्यानं चालल्या पान्यावरल्या रे लाटा.

'मन पाखरू पाखरू त्याचि काय सांगू मात, आता वहात भुईवर, गेलं गेलं आभायात.'

ह्या श्लोकात मनाला इन्द्रिय असे संबोधले आहे. आणि शिवाय मनाचा उल्लेख आहेच. अशा ह्या चंचल मनाला काबूत कसे ठेवायचे?

परि वैराग्यचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरें ।तरि केतुलेनि एके अवसरें । स्थिरावेल ॥ज्ञानेश्वरी ।6.419।।

श्रीमद्भगवद्गीतेच्या 6व्या अध्यायात ज्याचे नाव आत्मसंयम योग असे आहे, त्यामध्ये मनाचा निग्रह कसा करावा ह्या संबंधी विवेचन केले आहे. 'पी हळद अन् हो गोरी' असे कधीच शक्य नसते. योग ही अखंड साधना आहे.

'स तु दीर्घकालनैरन्तर्यसत्कारासेवितो दृढभूमिः ॥पतंजली, समाधीपाद।14।।

निरंतर, दिर्घकालीन सत्कारपूर्वक अभ्यासाने मनाचा निग्रह शक्य आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे सांगत आहेत की

हे कौन्तेय! (रसबुदधि असणारे) (संयमाचा) प्रयत्न करणाऱ्या बुद्धीमान पुरूषाचे मन सुद्धा, इन्द्रिये बलपूर्वक विचलित करतात.

---

तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः। वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।।2.61।।

सर्वाणि तानि संयम्य युक्तः मत्-परः आसीत हि । यस्य इन्द्रियाणि वशे तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।

सर्वाणि सर्व नपु. प्र. ब. व.

तानि ते तद् नपु. प्र. ब. व.

संयम्य संयमित सम+यम् धातू ल्यप प्रत्यय

युक्तः युक्त युज् धातू क्त प्रत्यय पु. प्र. ए. व.

मत्-परः मला समर्पित पर पु. प्र. ए. व.

आसीत असा हो आस् धातू बसणे कर्तरि विधीलिङः लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

हि नक्कीच अव्यय

यस्य त्याची यद् पु. ष. ए. व.

इन्द्रियाणि इन्द्रिये इन्द्रिय नपु. प्र. ब. व.

वशे ताब्यात वश पु. स. ए. व.

तस्य त्याची तद् पु. ष. ए. व.

प्रज्ञा बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

प्रतिष्ठिता स्थिर

प्र+स्था धातू क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

आपल्या भावना दडपून टाकण्याचा अतिरेक झाला की शारीरिक पातळीवर वाट शोधली जाते असे वैद्यकीय शास्त्रात म्हटले जाते. आतापर्यंतच्या श्लोकात मनाचा संयम, निग्रह, स्थिरबुद्धि, समाधीवस्था ह्या गोष्टींवर भाष्य केले होते. मात्र हे सर्व आपल्या इच्छेप्रमाणे घडावे, आपल्या मनाविरुद्ध, आपल्या भावनांना दडपून नव्हे. कारण आपल्याला परमात्म्याशी जोडून घेण्याची ओढ लागली आहे. त्यासाठी मत्पर हा शब्द वापरला आहे. आधीच्या अध्यायात आपले मनच आपल्याला, आपल्या ध्येयापासून विचलित करत असते असे वाचले. ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की (अशा विचलित करणाऱ्या) इन्द्रियांना ताब्यात ठेवून मला समर्पित होऊन रहावे. ज्यांचा आपल्या मनावर ताबा असतो त्यांची बुद्धी स्थिर असते.

---

ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते।

सङ्गात् संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते।।2.62।।

विषयान् ध्यायतः पुंसः तेषु सङ्गः उपजायते। सङ्गात् कामः सञ्जायते। कामात् क्रोधः अभिजायते।

विषयान् उपभोगांचे विषय विषय पु. द्वि. ब. व.

ध्यायतः चिंतनशील

ध्यै धातू मनन करणे शतृ प्रत्यय पु. ष. ए. व.

पुंसः व्यक्तिचा पुंस् पु. ष. ए. व.

पुंस् धातू वृद्धि होणे

तेषु त्यामध्ये तद् पु. स. ब. व.

सङ्गः आसक्ती सङ्ग पु. प्र. ए. व.

उपजायते वाढ होते उप+जन् धातू उत्पन्न होणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

सङ्गात् आसक्ती मुळे सङ्ग पु. पं. ए. व.

कामः कामना काम पु. प्र. ए. व.

सञ्जायते उत्पन्न होते सम+जन् धातू उत्पन्न होणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

कामात् वासनांपासून

काम पु. पं. ए. व.

क्रोधः क्रोध पु. प्र. ए. व.

अभिजायते उत्पन्न होते अभि+जन् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

आपल्या रोजच्या आयुष्यात उपयोगी पडेल असा श्लोक. आपल्यात असणाऱ्या लालसा, हव्यास आणि अती लोभी वृत्तीवर मार्गदर्शन करणारा. मानसशास्त्रीय सत्यावर भाष्य करणारा.

यत् पृथिव्यां व्रीहियवं हिरण्यं पशवः स्त्रियः। न दुह्यन्ति मनःप्रीतिं पुंसः कामहतस्य ते ।।श्रीमद्भागवतम्-9.19.13।।

जर मनुष्याने सर्व प्रकारची सुखे, जसे धन ऐश्वर्य उपभोगले तरी त्याची संतुष्टी झाली नाही तर ते दुःखाचे कारण बनते म्हणून बुद्धिमान पुरूषांनी कामनांचा त्याग केला पाहिजे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

विषयांचे चिंतन करत राहिले की त्यामधून आसक्ती निर्माण होते. आसक्ती मधून इच्छा आकांक्षांची वृद्धि होते आणि इच्छांमधून क्रोध निर्माण होतो.

---

क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः।

स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति।।2.63।।

क्रोधात् सम्मोहः भवति। सम्मोहात् स्मृति-विभ्रमः, स्मृति-भ्रंशात् बुद्धि-नाशः, बुद्धि-नाशात् प्रणश्यति।

क्रोधात् रागाच्या भरात क्रोध पु. पं. ए. व.

क्रुध् धातू क्रोध करणे

सम्मोहः मूढता सम्मोह पु. प्र. ए. व.

मुह् धातू बुद्धी भ्रष्ट होणे

भवति होते भू धातू होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सम्मोहात् मूढतेने सम्मोह पु. पं. ए. व.

स्मृति-विभ्रमः, भ्रमिष्टपणा स्मृति-विभ्रमः पु. प्र. ए. व.

भ्रम् धातू भ्रमण करणे

स्मृति-भ्रंशात् स्मृतिभ्रंश झाल्याने

स्मृति-भ्रंश पु. पं. ए. व.

बुद्धि-नाशः, बुद्धि चा नाश बुद्धि-नाश पु. प्र. ए. व.

बुद्धि-नाशात् बुदधिनाशामुळे पु. पं. ए. व.

प्रणश्यति संपूर्ण नाश होतो प्र+नश् धातू नाश होणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

रागाच्या भरात माणसे आदळआपट मारहाण,  करतात. आक्रमक होतात. दुसऱ्यांवर टीका, उपहास,  घालूनपाडून बोलणे, नावे ठेवणे, दुसऱ्याच्या सद्हेतूबद्दल अविश्वास दाखवणे अशा अनेक गोष्टी घडतात थोडक्यात मनुष्य आपली सद्विवेकबुदधि घालवून बसतो. सहज आठवले म्हणून सांगते. लॅटिन भाषेतून आलेला शब्द रेबीज (म्हणजे कुत्रा चावल्यानंतर होणारा आजार) हा सुद्धा अती क्रोध, माथेफिरू अशा अर्थाचा आहे. आधीच्या श्लोकात क्रोध, आसक्ती मुळे निर्माण होतो असे म्हटले आहे त्यापुढे महर्षी व्यासांनी ह्या श्लोकात असे म्हटले आहे की

क्रोधाने विवेकबुद्धी नष्ट होते. विवेकबुद्धी नष्ट झाली असता स्मृती भ्रष्ट होते. स्मृतिभ्रंश झाल्याने बुद्धी चा नाश होतो. आणि बुद्धी चा नाश झाला असता माणसाचे अधःपतन होते.

---

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन्।

आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति।।2.64।।

विधेय-आत्मा तु आत्म-वश्यैः राग-द्वेष-वियुक्तैः इन्द्रियैः विषयान् चरन् प्रसादम् अधिगच्छति।

विधेय-आत्मा आत्मसंयमी विधेय आत्मन् पु. प्र. ए. व.

वि+धा धातू धारण करणे

तु परन्तु अव्यय

आत्म-वश्यैः मन ताब्यात असणाऱ्या

आत्मन् वश्य पु. तृ. ब. व.

वश् धातू नियंत्रण करणे राग-द्वेष-वियुक्तैः राग द्वेष पासून वियोग राग-द्वेष-वियुक्त पु. तृ. ब. व.

वि+युज् धातू जोडणे

इन्द्रियैः इन्द्रियांच्या इन्द्रिय पु. तृ. ब. व.

विषयान् विषयांचे विषय पु. द्वि. ब. व.

चरन् उपभोग घेताना चर् धातू जाणे शतृ प्रत्यय पु. प्र. ए. व.

प्रसादम् कृपा प्रसाद पु. द्वि. ए. व.

प्र+सद् धातू +घञ्  प्रत्यय

अधिगच्छति प्राप्त होते अधि+गम धातू जाणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सुखी राहण्याचा गुरूमंत्र असे ह्या श्लोकाचे वर्णन करता येईल. सामान्य लोकांसाठी अतिशय उपयोगी असा श्लोक. बरेचदा आपल्या मनाविरुद्ध गोष्टी घडत असतात त्याचा राग न येऊ देता ते मिळवण्यासाठी प्रयत्न करत राहणे हे कौशल्य ज्याला जमते तो आयुष्यात यशस्वी होतो.

17 व्या अध्यायातील 16 व्या श्लोकात मनाची पवित्रता, प्रसन्नता, सौम्यता, आत्मसंयम आणि मौन ह्यास मानसिक तप असे म्हटले आहे.

अर्जुनाने विचारलेला प्रश्न, स्थितप्रज्ञ कसा असतो? त्याचे उत्तर ह्या श्लोकात मिळते.

62 आणि 63 व्या श्लोकात विषयांचे चिंतन करत राहिले असता आपली मनःस्थिती कशी कशी बदलते ते सांगितले. मनावर ताबा मिळवला असता बुद्धी स्थिर राहते असे 61 व्या श्लोकात सांगितले. उपभोगी वृत्ती पासून दूर राहावे पण ते पूर्णपणे ऐच्छिक असले पाहिजे. हे सर्व आपण वाचले. आता आणखी एक कंगोरा ह्या श्लोकात वाचायला मिळत आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

(आधीच्या श्लोकाचा संदर्भ घेऊन) परन्तु आत्मसंयमी पुरूष रागद्वेष रहीत आपल्या ताब्यात ठेवलेल्या इंद्रियांद्वारे उपभोग घेऊन प्रसन्नता (ईश्वरी कृपा) प्राप्त करतो.

---

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते।

प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते।।2.65।।

प्रसादे अस्य सर्व-दुःखानाम् हानिः उपजायते। प्रसन्न-चेतसः बुद्धिः हि आशु पर्यवतिष्ठते।

प्रसादे भगवंताच्या कृपेने प्रसाद पु. स. ए. व.

अस्य ह्याची इदम् पु. ष. ए. व.

सर्व-दुःखानाम् सर्व दुःखे सर्व दुःख नपु. ष. ब. व.

हानिः नाश हानि स्त्री. प्र. ए. व.

उपजायते होतात उप+जन् धातू कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

प्रसन्न-चेतसः प्रसन्न मनाने प्रसन्न-चेतस् नपु. ष. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

हि नक्कीच अव्यय

आशु शीघ्र अव्यय

पर्यवतिष्ठते दृढतेने स्थिर होते

परि+अव+स्था कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

नक्की आपला आनंद कशात आहे, आपल्यासाठी चांगले काय आणि वाईट काय हे ज्याला समजले त्याच्या आयुष्याचे सार्थक झाले असे म्हणतात. आधीच्या श्लोकात बाह्य सुखाच्या मोहापासून दूर रहावे असे सांगितले होते. आणि ह्या श्लोकात चित्त प्रसन्न असू द्यावे असे म्हटले आहे.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

ईश्वरी कृपा प्राप्त झाल्यानंतर सर्व दुःखांचा अन्त होतो. अशा प्रसन्न चित्त माणसाची बुद्धी सुद्धा त्वरित स्थिर होते.

---

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना।

न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम्।।2.66।।

अयुक्तस्य बुद्धिः न अस्ति, न च अयुक्तस्य भावना न च अभावयतः शान्तिः अशान्तस्य सुखम् कुतः?

अयुक्तस्य ज्यांनी मन व इंद्रिये जिंकलेली नाहीत त्यांची अ+युज् धातू क्त प्रत्यय पु. ष. ए. व.

बुद्धिः बुद्धि स्त्री. प्र. ए. व.

न अव्यय

अस्ति, असते अस् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

न अव्यय

च आणि अव्यय

अयुक्तस्य अ+युज् धातू क्त प्रत्यय पु. ष. ए. व.

भावना स्त्री. प्र. ए. व.

न अव्यय

च आणि अव्यय

अभावयतः निष्कामभाव अ+भू धातू णिच् प्रत्यय शतृ प्रत्यय पु. ष. ए. व.

शान्तिः शान्ति स्त्री. प्र. ए. व.

अशान्तस्य शांती नसलेल्या अशान्त पु. ष. ए. व.

सुखम् सुख नपु. प्र. ए. व.

कुतः कुठे? अव्यय

आणखी एक प्रेरणादायी श्लोक.

कर्मयोगात असे म्हटले आहे की आपली कर्म करत राहिले पाहिजे पण श्रेयाची अपेक्षा न ठेवता, सर्व काही परमात्म्याला अर्पण करून टाकायचे. आतापर्यंत आपण बुद्धी स्थिर कशी राहते ते वाचले.

परमात्म्याचे सानिध्य मिळणे हे तर अहो भाग्यम्! पण आपल्या साधारण आयुष्यात सुद्धा मनाची चलबिचल होऊ न देता काम करता येणे ही एक देणगीच. मनात अशांती असेल तर मनुष्य सुखी होण्याचा प्रश्नच नाही.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

ज्याचे मन आणि इन्द्रिये संयमीत नाहीत त्याच्या कडे आत्मज्ञान असत नाही, त्यामुळे त्याच्याकडे निष्काम भावना सुद्धा नसते म्हणून शांतीसुदधा नसते. ज्याच्या कडे अशांती आहे त्याला सुख कसे मिळणार?

---

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते।

तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि।।2.67।।

अम्भसि नावम् वायुः इव चरताम् इन्द्रियाणाम् हि यत् मनः अनुविधीयते, तत् अस्य प्रज्ञाम् हरति।

अम्भसि पाण्यातील अम्भस् नपु. स. ए. व.

नावम् होडी नौ स्त्री. द्वि. ए. व.

वायुः वारा वायु पु. प्र. ए. व.

इव जसे अव्यय

चरताम् हेलकावते चर् धातू शतृ प्रत्यय नपु ष. ब. व.

इन्द्रियाणाम् इन्द्रिय नपु. ष. ब. व.

हि कारण अव्यय

यत् जे यद् नपु. प्र. ए. व.

मनः मन पु. प्र. ए. व.

अनुविधीयते, गुंतून राहते अनु+धि धातू धारण करणे कर्तरि लट लकार आत्मनेपदी प्र. पु. ए. व.

तत् ते तद् नपु. प्र. ए. व.

अस्य ह्याची इदम् पु. ष. ए. व.

प्रज्ञाम् बुद्धि प्रज्ञा स्त्री. द्वि. ए. व.

हरति नामोहरम होते हृ धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

हा श्लोक वाचताना अर्जुनाचा रथ म्हणजे आपले शरीर, रथाला जोडलेले सहा घोडे म्हणजे षड्रिपू, त्यांना मनाच्या लगामाचे बंधन आणि तो लगाम खेचणारा सारथी म्हणजे मनावर असणारे बुद्धी चे नियंत्रण ह्या सर्वाची आठवण होते.

पराञ्चि खानि व्यतृणत् स्वयम्भूः, तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन् । कठोपनिषद् 2.1.1

स्वयंभू ने (परमात्म्याने) आपल्या देहाला बहिर्मुखी बनवले आहे म्हणून मनुष्य बाहेर बघत राहतो, अंतरात्मा नाही.

आपले मन किती पटकन विचलित होते हे सांगणारा हा श्लोक. ह्या श्लोकात बुद्धि ला नौकेची उपमा दिली आहे. मनाचा भिरभिरण्याचा वेग प्रकाशाच्या वेगापेक्षा सुद्धा जास्त आहे. एका क्षणात ते सूर्याकडे जाऊन पोहोचते. बुद्धिरूपी नावेला तरून जाताना हुशार नाविक वाऱ्याच्या दिशेचा उपयोग कौशल्याने करून घेतो तर काहींना वाऱ्याचा अडथळा होत असतो,त्यांची नाव भरकटत राहते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

अनियंत्रित इन्द्रियांमुळे मन  भरकटत राहते, जसे वाऱ्यामुळे पाण्यातील नाव हेलकावे खात राहते तसे एखाद्या इन्द्रियात जरी मन अडकले असता बुद्धी नामोहरम होते.

---

तस्मादृयस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः।

इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता।।2.68।।

तस्मात् हे महा-बाहो! यस्य इन्द्रियाणि इन्द्रिय-अर्थेभ्यः सर्वशः निगृहीतानि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।

तस्मात् म्हणून तद् पु. पं. ए. व.

हे महा-बाहो! महत् बाहू पु. सं ए. व.

यस्य ज्याची यद् पु. ष. ए. व.

इन्द्रियाणि इन्द्रियांचे इन्द्रिय नपु प्र. ब.व.

इन्द्रिय-अर्थेभ्यः इन्द्रिय विषयक

इन्द्रिय-अर्थ नपु. पं ब. व.

अर्थ प्रयोजन

ऋ धातू प्राप्त करणे

सर्वशः सर्व प्रकारे अव्यय

निगृहीतानि संयमीत केलेली नि+रह् धातू त्यागणे क्त प्रत्यय नपु. प्र. ब. व.

तस्य त्याची तद् पु. ष. ए. व.

प्रज्ञा बुद्धि प्रज्ञा स्त्री प्र. ए. व.

प्रतिष्ठिता स्थिर प्र+स्था धातू स्थित असणे क्त प्रत्यय स्त्री. प्र. ए. व.

ह्या श्लोकात सर्वशः ह्या शब्दाचा अर्थ सर्व व्यवहारात असा घेतला तर हा श्लोक आपल्या रोजच्या आयुष्यात देखील लागू पडेल. एका वाईट व्यक्ती मुळे दुसरा मनुष्य वाईट वागतो, त्याला आपण संगतीचा परीणाम असे म्हणतो. प्रलोभनांना बळी पडू नये असे सांगणारा हा श्लोक.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

म्हणून हे महा-बाहो? ज्याची इन्द्रिये सर्व प्रकारच्या इन्द्रियांच्या विषयांवर नियंत्रित असतात त्याची बुद्धी स्थिर असते.

---

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी। यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः।।2.69।।

सर्व-भूतानाम् या निशा, संयमी तस्याम् जागर्ति। यस्याम् भूतानि जाग्रति, पश्यतः मुनेः सा निशा।

सर्व-भूतानाम् सर्व जीवाची सर्व भूत पु. ष. ब. व.

या जी यद् स्त्री. प्र. ए. व.

निशा, रात्र निशा स्त्री. प्र. ए. व.

निश् धातू समाधी, ध्यान लावणे

संयमी आत्मसंयमी संयमिन् पु. प्र. ए. व.

तस्याम् त्यामध्ये तद् स्त्री स. ए. व.

जागर्ति जागृत जागृ धातू जागणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

यस्याम् ज्यामध्ये यद् स्त्री. स. ए. व.

भूतानि सर्व जीव भूत नपु. प्र. ब. व.

जाग्रति, जागे जागृ धातू जागणे कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

पश्यतः पाहणार्यांसाठी दृश् धातू शतृ प्रत्यय पु. ष. ए. व.

मुनेः मुनि पु. ष. ए. व.

सा ती तद् स्त्री. प्र. ए. व.

निशा रात्र निशा स्त्री. प्र. ए. व.

निश् धातू समाधी, ध्यान लावणे

हा श्लोक वाचल्यावर वटवाघळांची किंवा निशाचरांची आठवण होते. वटवाघळांना समृद्धि चे प्रतिक मानले जाते.

निशा ह्या शब्दावर उच्च स्वरूपाची अध्यात्मिक कोटी केली आहे. कृत्रिम बुध्दीमतेच्या साह्याने ह्या श्लोकाचे भाषांतर होऊ शकणार नाही. त्यासाठी अर्थच नीट समजून घ्यायला हवा.

ह्या श्लोकात निशा म्हणजे रात्र ह्या शब्दाचा वापर प्रतिकात्मक केला आहे. भोगी व्यक्तींना जेव्हा निरनिराळ्या गोष्टींचा उपभोग घेणे शक्य नसते तेव्हा त्यांच्या साठी ती रात्र असते. कारण अंधारात सर्व काही थांबलेले असते. हिच परिस्थिती मुनींच्या दृष्टीने आत्मज्ञान मिळण्याची असते. त्यांची संयमित इन्द्रिये आणि मन फक्त परमात्म्याचा विचार करत असतात.

भोगी व्यक्ती जेव्हा उपभोग घेत असतात तेव्हा ते आनंदी असतात त्यांचे असे जागेपण हे मुनींच्या दृष्टीने हानिकारक. म्हणजे त्यांच्या साठी काळरात्र.

म्हणून ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

सर्व जीवांसाठी जी रात्र आहे ती संयमी पुरूषांसाठी जागृत अवस्था आहे. आणि जेव्हा सर्व जीव जागेपणी उपभोगात मग्न असतात ती वेळ मुनींसाठी रात्र असते.

---

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं

समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत्।

तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे

स शान्तिमाप्नोति न कामकामी।।2.70।।

यद्वत् आपः आपूर्यमाणम् अचल-प्रतिष्ठम् समुद्रम् प्रविशन्ति, तद्वत् सर्वे कामाः यम् प्रविशन्ति, सः शान्तिम् आप्नोति; न काम-कामी ।

यद्वत् जसे अव्यय

आपः जल अप स्त्री प्र. ब. व.

आपूर्यमाणम् परीपूर्ण आपूर्यमाण पु. द्वि. ए. व.

पृ धातू व्यापणे

अचल-प्रतिष्ठम् विक्षुब्ध न होता

अचल-प्रतिष्ठ पु. द्वि. ए. व.

समुद्रम् समुद्र पु. द्वि. ए. व.

प्रविशन्ति, प्रवेश करतात प्र+विश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

तद्वत् तसेच अव्यय

सर्वे कामाः सर्व इच्छा

सर्व काम पु. प्र. ब. व.

यम् ज्यामधे यद् पु. द्वि. ए. व.

प्रविशन्ति, प्रवेश करतात प्र+विश् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ब. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

शान्तिम् शान्ति स्त्री द्वि. ए. व.

आप्नोति प्राप्त करतो

आप धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

न अव्यय

काम-कामी इच्छापूर्ति ची कामना करणारा काम-कामिन् पु. प्र. ए. व.

रोज ध्यानधारणा आणि संयमीत जीवनशैलीचा परीणाम आपल्या व्यक्तीमत्वावर दिसून येतोच. ध्यानधारणा करण्याचे फायदे शास्त्रीयदृष्ट्या सिद्ध झाले आहेत जसे एकाग्रता, राग आणि निराशा ह्या भावनांची कमी तीव्रता, आत्मविकास, मनामध्ये एकप्रकारची विशालता, शांतता आणि आनंद. ह्या सर्वांचे वर्णन महर्षी व्यासांनी विशाल सागराची उपमा देऊन केले आहे. काही व्यक्तींची जराशा आवाजाने सुद्धा शांती बिघडते तर योगीची भर गर्दीतही शांतता भंग होत नाही. विशाल सागराचे सुद्धा तसेच आहे. असंख्य नद्या समुद्राला येऊन मिळतात. जसे नदीला पूर आल्याने समुद्राला फरक पडत नाही तसे नदी उन्हाळ्यात आटून गेल्या तरी सुद्धा नाही. त्याचे भरती ओहटी चे चक्र आणि इतर कार्य अव्याहत चालू राहते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जसे निरनिराळ्या नद्या समुद्राला येऊन मिळाल्या तरी समुद्र अविचल असतो तसेच सर्व उपभोगाच्या गोष्टी संयमी व्यक्तीला अविचल ठेवतात त्यालाच शांती प्राप्त होते, लालसा असणाऱ्या व्यक्तीला नाही.

---

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः।

निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति।।2.71।।

यः पुमान् सर्वान् कामान् विहाय, निर्ममः निरहङ्कारः निःस्पृहः चरति, सः शान्तिम् अधिगच्छति।

यः जो यद् पु. प्र. ए. व.

पुमान् पुरूष पुमत् पु. प्र. ए. व.

पुंस् धातू वृद्धि होणे

सर्वान् संपूर्ण सर्व पु. द्वि . ब. व.

कामान् कामना काम पु. द्वि . ब. व.

विहाय, त्यागून वि+हा धातू ल्यप प्रत्यय

निर्ममः आसक्ती रहीत निर्+ममः निर्मम पु. प्र. ए. व.

निरहङ्कारः अहंकार रहीत निर्+अहङ्ःकार पु. प्र. ए. व.

निःस्पृहः स्पृहा रहीत निःस्पृह पु. प्र. ए. व.

चरति वावरतो चर् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

सः तो तद् पु. प्र. ए. व.

शान्तिम् शान्ति स्त्री. द्वि. ए. व.

अधिगच्छति प्राप्त होते अधि+गम् धातू जाणे कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

श्रीमद्भगवद्गीता हा फक्त आपला धर्मग्रंथ नाही तर जीवनकौशल्ये शिकवणारा मार्गदर्शक सुद्धा आहे. आधीच्या श्लोकापासून आपण शांती कशी प्राप्त करू शकतो ह्यावर महर्षी व्यासांनी भाष्य केले आहे.

प्रत्येक वेळेस श्रीमद्भगवद्गीतेतील श्लोकांचा अध्यात्मिक दृष्टीने विचार न करता तो आपल्या रोजच्या आयुष्यात कसा उपयोगी पडेल असा विचार केला तर ह्या श्लोकातून बरेच काही शिकायला मिळेल. महर्षी व्यासांनी सुद्धा ह्या श्लोकात योगी, ज्ञानी असे शब्दप्रयोग न करता, जो, तो असेच म्हटले आहे. म्हणजे सामान्य लोकांनी सुद्धा ह्या मधून बोध घेण्यासारखे आहे.

ह्या श्लोकात कामना आणि स्पृहा असा शब्दप्रयोग केला आहे. त्या दोन्ही मधील फरक समजून घ्यायला हवा. जाणकारांच्या मते ज्या गोष्टी प्राप्त करणे अवघड आहे, जसे मुक्ती मिळवणे, त्याची लोक कामना करतात. रोजच्या व्यवहारातील आवश्यक गोष्टींची लोकांना स्पृहा असते जसे नवीन वाहन असावे. नवीन घर असावे वगैरे. योगी व्यक्तींनी स्पृहांचा त्याग केलेला असतो. 18 व्या अध्यायाचे नावच मोक्षसंन्यासयोग असे आहे. म्हणजे मोक्षाची सुद्धा इच्छा ठेवायची नाही. अहंकारासंबंधित विस्तृत विवेचन 16 व्या आणि 17 व्या अध्यायात वाचायला मिळेल.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

जो मनुष्य सर्व कामनांचा त्याग करतो, स्पृहा रहीत असतो, आसक्ती रहीत आणि अहंकारविरहीत ज्याचे आचरण असते त्याला शांती प्राप्त होते.

---

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति।

स्थित्वाऽस्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति।।2.72।।

हे पार्थ! एषा ब्राह्मी स्थितिः, एनाम् प्राप्य न विमुह्यति, अन्तकाले अपि अस्याम् स्थित्वा ब्रह्म-निर्वाणम् ऋच्छति।

हे पार्थ!

एषा अशी एतद् स्त्री. प्र. ए. व.

ब्राह्मी ब्राह्मी स्त्री. प्र. ए. व.

स्थितिः स्थिति स्त्री. प्र. ए. व.

एनाम् ह्याची इदम् स्त्री. द्वि. ए. व.

प्राप्य प्राप्त होऊन प्र+आप् ल्यप प्रत्यय

न अव्यय

विमुह्यति, मोहित होते वि+मुह् धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

अन्तकाले अन्तकाल पु. स. ए. व.

अपि सुद्धा अव्यय

अस्याम् ह्यामधे इदम् स्त्री. स. ए. व.

स्थित्वा स्थित होऊन स्था धातू क्त्वा प्रत्यय

ब्रह्म-निर्वाणम् ब्रह्मलीन ब्रह्म-निर्वाण नपु. द्वि. ए. व.

निर+वा धातू जाणे

निर्वाण विझून जाणे

ऋच्छति प्राप्त होतो ऋ धातू कर्तरि लट लकार प्र. पु. ए. व.

2र्या अध्यायातील समारोपाचा श्लोक. एकदा पोहायला शिकले की ते आयुष्यभर लक्षात राहते हे आपापल्या माहित आहे. असेच काहीसे ह्या श्लोकात सांगितले आहे. भौतिक जगात मुलांवर जे संस्कार सुरवातीला केले जातात ते बराच काळ टिकून राहतात. एषा म्हणजे आधीच्या श्लोकात सांगितल्याप्रमाणे सर्व गोष्टींचा त्याग करून.अहंकार म्हणजे स्वतः ची ओळख आणि त्याबद्दल असणारा अभिमान. अहंकार संपला म्हणजे स्वतः ची ओळख संपली म्हणजेच आत्मा ब्रह्माशी एकरूप झाला. त्याला ब्रह्मप्राप्ती झाली,ब्रह्मज्ञान झाले.

तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः । दिवीव चक्षुराततम् ॥

ऋग्वेद-1.22.20

जसे सूर्यप्रकाशात सर्व गोष्टी स्पष्ट दिसतात तसे ज्ञानी व्यक्तींना विश्वव्यापी विष्णूंची अनुभूती होते.

ह्या श्लोकात श्रीभगवानकृष्ण असे म्हणतात की

हे पार्थ! हि ब्रह्मस्थिती आहे जी प्राप्त झाल्यानंतर व्यक्तीला कसलीच भुरळ पडत नाही. अगदी शेवटच्या क्षणी सुद्धा ही स्थिती कायम राहून ब्रह्मप्राप्ती होते.